# मराठ्यांचा–मनसबदार

## ऐतिहासिक संगीत नाटक

अंक एक ते तीन

---

लेखक—

रघुनाथ भाऊराव शिंदे,

—तिवरें

# प्रास्ताविक चार शब्द

आपल्या समाजांत अशी एक सर्व साधारण समजूत आहे कीं कांहीं विशिष्ट व्यवसायातील लोकांकडूनच वाङ्मयीन कलाकृतींचीं निर्मिति होणें शक्य आहे. साधारणपणें ज्यांना आपण learned professions अथवा विदग्ध व्यवसाय म्हणतों ते अनुसरणारे लोकच साहित्यनिर्मिति करूं शकतात. एखादा लेखक म्हटला कीं तो पांढरपेशा वर्गांतील आणि वर दर्शविलेल्या व्यवसायांतीलच असला पाहिजे अशी आपली कल्पना होते. प्रस्तुत नाटकाचे लेखक श्रीयुत र. भा. शिंदे हे व्यवसायानें शोफर अथवा मोटार-वाहक आहेत असें मी सांगितलें तर वरील सर्वसाधारण समजुतीला धक्का बसेल आणि वाचकास आश्चर्य आणि कुतूहल वाटेल यांत शंका नाहीं.

श्रीयुत शिंदे यांना मी गेलीं अनेक वर्षे ओळखीत आहे. पण त्यांनीं एक नाटक लिहिलें आहे हें कळल्यावर मला सानंदाश्चर्य वाटलें हें मी एकदम कबूल करतों. आणि म्हणूनच या नाटकाला उत्तेजनपर प्रास्ताविक चार शब्द लिहिण्यास मी सिद्ध झालों आहे.

हें नाटक वाचल्याबरोबर मला प्रथम आंग्ल कवि ग्रे याच्या सुप्रसिद्ध वचनाची आठवण झाली. ग्रे म्हणतो कीं अत्यंत विशुद्ध तेजानें चमकणारीं अनेक रत्नें महोदधीच्या अगाध अंधेऱ्या कोपऱ्यात पडलेलीं असतात आणि अनेक सुगंधीं पुष्पें कोणाच्याहि दृष्टीस न पडतां विजन अरण्यात कोमेजून जातात. साहित्यक्षेत्रांतहि अनेकवेळा असेंच नाहीं का होत ? कित्येक वेळा आपणास असे दिसतें कीं किती तरीं संभवनीय साहित्यिकांच्या प्रतिभेचें तेज प्रतिकूल परिस्थिति आणि सधींचा अभाव यांच्या आवरणांनीं आच्छादून गेल्यामुळें केव्हाहि जगाच्या निदर्शनास न येतांच विराम पावतें. श्रीयुत शिंदें याचेहि कदाचित् असेंच झालें असतें पण त्यांनीं धडाडीनें हें नाटक प्रकाशण्याचीच केवळ नव्हे तर रंगभूमीवर आणण्याचीहि सिद्धता केली आहे यामुळें मला आनंद होतो.

मराठ्यांच्या इतिहासात छत्रपति राजाराम महाराजांचा काल एका दृष्टीनें पडता तर दुसऱ्या दृष्टीने उज्ज्वल समजण्यात येतो. मोंगलांना फितूर होऊन स्वराज्याशीं बेइमानी करणारे कांहीं लाछनास्पद स्वार्थी नरपशू जसे या कालात निर्माण झाले तसेच स्वराज्यासाठीं स्वतःच्या प्राणांची आहुती देणारे अनेक देशप्रेमी नरशार्दूलहि याच कालांत चमकून गेले. प्रस्तुत नाटकातील संविधानक या राजारामकालीन कांहीं घटनावर आधारलेलें आहे. या घटनांमध्यें सत्याचा अंश किती आणि कविकल्पनेचा किती हा प्रश्न चर्चिण्याचें हें स्थल नव्हे. तसेच वाङ्मयीन कलाकृति बोधप्रधान असावी कीं आनंदप्रधान आणि या दृष्टीनें प्रस्तुत नाटकाचें मूल्य कोणतें हेंहि सागण्याचा माझा हेतु नाहीं. तरी पण या नाटकातील एका वाक्याकडे सर्व मराठ्याचें म्हणजे महाराष्ट्रीयाचें लक्ष मी वेधूं इच्छितों. ते वाक्य हें "मराठ्यांच्या दौलतीला लागलेली कुसंपाची कीड म्हणजे आपसातील दुही!" हे वाक्य राजाराम महाराजाच्या कालीं जितके भयंकर अर्थपूर्ण होतें तितकें या कालींहि आहे. आम्ही मराठ्यांनीं या वाक्याच्या शिकवणीकडे लक्ष द्यावयास नको का?

प्रस्तुत नाटक मंत्र व तंत्र या दृष्टींनीं निर्दोष आहे, किंवा तें मराठींतील प्रथम श्रेणींतल्या नाटकांच्या योग्यतेचें आहे असें म्हणून श्रीयुत शिंदे यांची अवास्तव स्तुति करण्याची माझी इच्छा नाहीं. हें नाटक वाचल्यावर एक गोष्ट माझ्या प्रत्ययाला आली. ती ही कीं श्रीयुत शिंदे यांच्यांत वाङ्मयीन प्रतिभेचा स्फुलिंग आहे. या स्फुल्लिंगावर वाचन व उद्योग यांचें इंधन घातल्यास त्याची प्रतिभा याहून किती तरी अधिक तेजाळेल व श्रीयुत शिंदे हे साहित्यिक म्हणून मराठींत कीर्ति संपादन करतील या विषयीं मला संशय वाटत नाहीं. कारण काव्यसंपदेचें कारण सागताना महाकवि दंडी म्हणतो "नैसर्गिकी च प्रतिभा श्रुतं च बहु निर्मलम् । अमन्दश्चाभियोगश्च कारणं काव्यसंपदः ॥" काव्यादर्श १. १०३

**अ. बा. गजेन्द्रगडकर**

२७ मार्च १९४५ [ अध्यक्ष, मुंबई मराठी साहित्य संघ ]

# समाधान !!

'माझा या घरांत निभाव लागेल काय ? माझं जीवन सुखांत जाईल की नाहीं ? अशा साशंक भावनेनं नवविवाहीत वधू ज्याप्रमाणें आपलें पहिले पाऊल सासरीं टाकतें, त्या प्रमाणें भारतीय नाट्योद्यानांत पाऊल टाकतांना या लेखकाला वाटत आहे. निरनिराळ्या भावनाचे नांच त्याच्या मनःसागरावर चालू आहेत. ज्या भारतीय नाट्योद्यानाला हिंदी साहित्यातील नामवंत नाट्याचार्यांनीं आपल्या कलेच्या विविध पुष्पांनीं सुशोभित केलं, त्या शोभेंत भर टाकण्याचें धाडस प्रस्तुत लेखक करीत आहे. खरोखर हें एक धाडसच आहे. परंतु या लहानग्या व बिन वासाच्या पुष्पाकडे सुरुचिर साहित्यक सहानुभूतीच्या व कौतुकाच्या दृष्टीनें पाहतील अशी निराशायुक्त आशा प्रस्तुत लेखकाला वाटत आहे.

मराठी साहित्यांत ऐतिहासीक नाटकांचा नुसता कच पडला आहे. असें असतांना प्रस्तुतच्या कथानकाची निवड या लेखकानीं कां केली, असा एक प्रश्न उपस्थित होण्याचा संभव आहे. परंतु त्याला तसेंच एक कारण घडून आलें.

प्रस्तुत लेखक रजेंत आपल्या गावीं गेला असताना, त्याचे चुलते कै. गोविंदराव उर्फ दादासाहेब शिंदे यांच्या जवळच्या राजारामकालीन व पेशवे कालिन पत्रांचा संग्रह पाहण्याचा सुयोग त्याला लाभला. या पत्रांत महत्वाचें पण अगदींच जीर्ण झालेलें एक पत्र होतें. हें पत्र ब्रह्मेंद्र स्वामींनीं राजाराम महाराजाना लिहिलेलें होते. सूर्याजी पिसाळाच्या मृत्युपूर्वीची त्याची स्थिती, त्याला स्वतःच्या कृत्याबद्दल झालेला पश्चाताप, त्याची पत्नी 'मीरा' राजाराम महाराजाकडें गेल्याची बातमी, तिला ताबडतोब आश्रमा कडे पाठविण्या सबंधींचा उल्लेख त्या पत्रांत होता. तें पत्र इतकें जीर्ण झाले होते कीं हात लागताच त्याचें तुकडे पडत, शिवाय कुसरीबाईनींहीं आपल्या चिमुकल्या दातांचा प्रसाद देऊन त्या पत्राची चाळण करून ठेवली होती.

महत्प्रयासानें शब्दांची जुळणी करून एकदाचें तें पत्र या लेखकानें वाचून काढलें. रायगडच्या घटने नंतर सूर्याजी पिसाळ आणि त्याची पत्नी मीरा यांचे पुढें काय झाले, यासंबंधीचा इतिहास जवळ जवळ कोराच आहे. एक दोन ठिकाणीं यांच्यासंबंधीचा ओझरता उल्लेख आला आहे. या पत्रानें पिसाळाच्या जीवनावर प्रकाश ज्योत पडत असल्यानें, या पत्राधारे एखादे कथानक नाट्यरूपानें रसीक जनतेसमोर ठेवावें असें या लेखकास वाटले. या संबंधीं लेखकाचें त्याच्या चुलत्या बरोबर बरेंच बोलणें झाले. विचार ठरला. विचार आणि कृति यांत जमीन अस्मानाचें अंतर असतें. रजेवरून परत आल्यावर कामाच्या गर्दीमुळें जीवनाच्या झगड्यांत सापडून वरील विचार मनांतल्या मनांतच विरून गेला. कांहीं दिवसांनंतर मराठ्यांच्या इतिहासाबद्दलच्या गोष्टीं निघाल्या, व त्यावर बराच वादविवादही झाला. या वादामुळें नाट्यलेखनाच्या माझ्या विचारानें उचलखाल्लीं; ती वैचारीक उचल म्हणजे प्रस्तुतचा " मराठ्यांचा मनसबदार " होय. वरील पत्र साधारण फोटो घेण्यालायक असतें तर त्याचा ब्लॉक करून प्रसिद्ध करण्याचें भाग्य प्रस्तुत लेखकाला लाभले असतें. या पत्राच्या प्रसिद्धि करण्यानें लेखकालाच काय, परंतु इतिहास भक्तांना देखील त्याबद्दल आनंद झाला असता. परंतु कठोर काळानें त्या पत्राचा बळी घेतल्याने " अरेरे ! इतिहासाचें एक महत्वाचें पान हरपलें " या उद्गाराशिवाय आम्हाला तरी काय करतां येण्यासारखें आहे.

हें नाटक लिहिण्यापूर्वी कांहीं ऐतिहासिक ग्रंथ, कादंबऱ्या, व संशोधित ग्रंथ, या लेखकाला वाचावे लागले. हे ग्रंथ वाचीत असता इतिहासांत घडलेल्या घटनांचे चित्रपट डोळ्यां समोरून झरझर सरकूं लागले. पूर्वग्रह दूषित न होतां इतिहासांतील घडलेल्या प्रसंगाची समतोल मनाने छाननी करतानां मराठ्याच्या इतिहासांत सूर्याजी पिसाळ एकटाच देशद्रोही होता कायं ? पिसाळा खेरीज बाकी सारे खरेखुरे देशभक्त होते काय ? मरा-

ठ्यांनी मारलेल्या लढाया या स्वातंत्र्या करितांच होत्या काय ? मराठ्यांनीं, व पेशव्यानीं स्वार्थरहित, निरपेक्ष बुद्धिनें लढाया लढाविल्या होत्या काय ! अशा किती तरी प्रश्नानीं प्रस्तुत लेखकाला भंडावून सोडले होते.

वरील प्रश्नाचीं उत्तरें इतिहासांत निराळीच व परस्पर विरोधी अशी सांपडतात. मध्ययुगीन कालापासूनचा इतिहास चाळला तर सूर्याजी पिसाळा पेक्षांहि भयंकर, विश्वास घातकी, स्वामीद्रोही स्वार्थी पिसाळांचीच परंपरा जास्त दिसून येतें. ज्या मौर्य घराण्यांबद्दल आम्हां हिंदुस्थानच्या हिंदुना, मोठा अभिमान वाटतो, तें राजघराणें नंद घराण्याच्या नाशावर विष्णू गुप्त ( चाणक्य ) याच्या स्वार्थी कारस्थानानें अस्तित्वात आलें. शेवटचा राजा ब्रहद्रथ यांचा सेनापती पुष्यमित्र शुंग यानें त्याचा वध करून मौर्यवंशाची राखरांगोळी केली. चाणक्य हा स्वार्थी पिसाळ नव्हता काय? मग या "चाणक्य" सारख्या स्वार्थी पिसाळाचा उदो उदो आमचे इतिहासकार व लेखक कां करीत आहेत हें एक गूढच आहे शुंग, मालव, कनोज, आंध्र, शालिवाहन, चालुक्य, राष्ट्रकूट, विजयनगर, दौलता. बाद(यादव घराणें) या सार्‍या राजवंशाचा इतिहास पाहिला, म्हणजे सूर्याजी पिसाळा पेक्षांही जास्त स्वार्थी पिसाळ त्या काळीं होते हें सिद्ध होत नाहीं काय? त्या काळचे सारे राजे स्वसत्ते करितांच लढत होते, व या लढ्यांच्या कारस्थानांत स्वार्थी पिसाळांचाच नंगा नाच दिसून येतो हें कुणालाही ना कबूल करता येण्यासारखे नाहीं. त्या काळचे राजे हिंदू होते म्हणून त्याना स्वार्थी पिसाळ म्हणावयाचें नाहीं, असा परमेश्वराचा अबाधीत कायदा आहे काय ?

मुसलमानांच्या स्वार्‍या सुरु झाल्या. हिंदुस्थानच्या कोनाकोपर्‍यात त्यांची राज्यें स्थापन झाली. आदिलशाही सारख्या मुसलमानी दरबारात शहाजी भोंसल्या सारखे हिंदू सरदार चमकुं लागले. प्रश्न असा आहे कीं मुसलमानांची सत्ता दृढमूळ होण्याकरीता कोण कारणीभूत झाले?... आमचे

हिंदु राजेच ना ? पृथ्वीराजावर महंमद घोरीनें स्वारी केली, त्या वेळी कनोजच्या जयचंदानें त्याला मदत करून पृथ्वीराजाला मारविले. हिंदुस्थानात मुसलमानी राज्यस्थापनेचा पाया याच घटनेनें घातला गेला ही गोष्ट इतिहासानें सिद्ध केली आहे. रजपुतांचा इतिहास, भावबंदकी, एकमेकां विरुद्ध असलेले हाडवैर, सत्ता, याबद्दलच्या लढयानेंच भरून गेला आहे. राणाप्रताप देशोधडीस लागून हळदीघाटाचें युद्ध लढतो आहे, तर त्याचा भाऊ मोंगलाचा एक बडा सरदार बनून, आपल्या भावाचा सूड उगविण्याकरितां त्याच्यावर स्वारी करतो याचा स्पष्ट अर्थ हा आहे कीं त्या काळच्या लढाया देशाच्या स्वातंत्र्याकरितां लढल्या जात नसून, स्वसत्तेकरितांच त्या लढल्या जात होत्या.

शहाजी भोंसल्यानीं तरी काय केलें ? आदीलशाहीचें राज्य विस्तार करण्यांतच स्वतःच्या आयुष्याची बरीच वर्षें त्यानीं खर्ची घातली आहेत. आज ज्या निजामाच्या विरुद्ध आमचे हिंदुत्व निष्ठ दात ओठ चावून बोटें मोडीत आहेत, त्या हैद्राबादेच्या निजामशाहीला मदत करून त्याच्या संस्थानचा पाया मजबूत करण्यांतच शहाजी भोंसले हे स्वतःला धन्य मानून घेत होते. आमच्या इतिहासकारानीं शहाजीराजे यांना ‘ किंग मेकर ’ म्हणून पदवी बहाल करून त्यांच्या कृतीचें कौतुक व गुणगौरव केले आहे. हो तो एक इतिहासाचा जुना काळ होता ! नुकतेंच एका विद्वान् व्याख्यात्यांनीं पेशवाईवरची आपली निष्ठा प्रगट करताना सांगितले,— नव्हे अधिकार वाणीनें सांगितलें— कीं, इतिहासाची छाननी करतांना ऐतिहासीक कालीन परिस्थितीचा अवश्य विचार करावा. इतिहासांत नमूद केलेल्या घटनांचे साधक बाधक प्रमाणानीं छाननी करून त्या काळचे वास्तव चित्र कुणी रेखाटलें म्हणजे त्या लेखकांवर सारे लेखक पिसाळासारखे तुटून पडतात. या टीकाकारांना त्याकाळचें वास्तव चित्र नको असते. तर आजपर्यंत ज्या लेखकांनीं ज्या विशिष्ट अंधश्रद्धाळू दृष्टिकोणानें त्या

ऐतिहासीक घटनांची " री " ओढली आहे, त्याचीच " री " सर्वांनीं ओढावी असा या टीकाकारांचा अटाहास आहे. पण सत्य कुणाच्याही अटाहासाची पर्वा करीत नाहीं. सारांश, मुसलमानाची सत्ता प्रस्थापीत होण्यास आमचेच लोक कारणीभूत झाले होते, असाच इतिहासाचा निर्वाळा आहे.

नेहमी असें सांगण्यांत येतें कीं, थकल्या भागल्यावर शहाजी भोंसल्यानीं हिंदुपदपादशाही स्थापन करण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याला यश आलें नाहीं. पण शिवाजी महाराजांनीं तो मान पटकाविला, आणि स्वतःला राज्याभिषेक करून घेऊन " छत्रपति व गोब्राह्मण प्रतिपालक " या बिरुदावळीची उपाधी आपल्या नांवाच्या मागें लावून घेतली. शिवाजी महाराज हिंदुपदपादशाहीचे खरेखुरें प्रतिक बनले. " स्वातंत्र्याच्या आरोळ्या " जोरांत ऐकूं येऊं लागल्या. मुसलमानांना हिंदुस्थानाबाहेर हांकलून देऊन -क्विट-इंडिया- हिंदु राजाची म्हणजे शहा शिवाजीची सत्ता हिंदुस्थानात स्थापन करणें अशी त्या काळची व्याख्या होती. मावळ्या सारख्या अशिक्षीत, धर्मश्रद्धाळू, व पाहाडांतून वसत असलेल्या सरदार, जमीनदार, इनामदार यांच्या धार्मिक भावना चेतवून त्यांना मुसलमाना-विरुद्ध लढण्यास भाग पाडले. अंध श्रद्धेवर आधारलेल्या धार्मिक भावना चेतविलेल्या चितेवर हिंदुपद पादशाहीचीं इमारत उभारली होती. मुसलमानीं राजाकडून चौथाई, व सरदेशमुखीची सनद मिळाली कीं, तें युद्ध, त्या स्वातंत्र्याच्या वल्गना तात्काळ बंद होत. मोंगल सम्राटानें शहा शिवाजीला सरदारकीची वस्त्रें, चौथाई व सरदेशमुखीच्या सनदा बहाल केल्या, आणि मोठया आग्रहानें त्याला भेटीस आग्ऱ्यास बोलाविले. इतिहासकारांनीं "क्यौं मोंगल सम्राट नरमला कीं नाहीं " असें या प्रसंगाचें चित्र रेखाटलें आहे. मराठ्यानीं मारलेल्या मोठमोठ्या लढाया, पेशव्यानी

पानिपतच्या रणांगणावर फोडलेल्या लाखों बांगड्या, अटकेवर रोंवलेला, भगवा झेंडा, या साऱ्या गोष्टी देशाच्या स्वातंत्र्याकरितांच केल्या गेल्या का स्वसत्तेकरितांच त्या केल्या गेल्या हा एक प्रश्न मनांत उभा राहतो. त्या काळच्या लढयांच्या कार्य कारणाच्या मुळाशीं जाऊन स्वातंत्र्याचा शोध केला, तर त्यांतून स्वातंत्र्याच्या रत्ना ऐवजीं सत्तापिसाळांनीं लावलेल्या आगीनें स्वातंत्र्याचे जळून खाक झालेले कोळसेच हातीं लागतात. हा दैवदुर्विलास नव्हे काय ! राजवंशातील लोकांची स्वार्थी कुटिल कारस्थानें, पेशव्यांनीं सत्तेकरितां चालविलेली अंतर्महालांतील कत्तल, याचा परिणाम म्हणजे शिवाजी महाराजांनीं फुंकलेला स्वातंत्र्याचा शंख फुटला स्वातंत्र्याचा वेणुनाद बंद पडला. स्वार्थी पिसाळांचा हैदोस दुल्ला सुरुं झाला. या हैदोस दुलयाचा फायदा परकियांनीं घेतला व आपली सत्ता हिंदुस्थानांत स्थापन करून सारा देश गुलामगिरींत चेचून टाकला.

१८५७ सालचें बंड उद्भवलें. या बंडाला कांहींजणानीं "स्वातंत्र्य युद्ध" म्हणून स्वतःची पाठ थोपटून घेतली. धर्मवेडामुळें उठलेल्या बडान, स्वतःच्या बापाची आठ लाखाची वार्षिक चंदी बंद झाल्यामुळें भडकलेल्या, व सूडानें बेफाम झालेल्या नानासाहेब पेशव्यानीं भाग घेतला, व त्यांच्या सारखेच राज्यहीन झालेल्या अयोद्धेच्या व इतर ठिकाणच्या नबाबजादे या बंडांत दाखल झाल्यामुळे बंडाला उग्र स्वरुप आले. शिवाजी महाराजांच्या काळचे संस्थानिक, सरदार, इनामदार, सरदेशमुख, यांनीं आपल्या जहागिरी, इनामी, सरदेशमुखी, कायम ठेवण्यात, व आपले कातडे सांभाळण्यांतच आपली बुद्धी खर्ची घातली, अशी वस्तुस्थिती असतांना स्वार्थी पिसाळांनीं माजविलेल्या बंडाला "स्वातंत्र्य युद्ध" म्हणून नाव देऊन. "स्वातंत्र्य" या पवित्र नांवाला काळीमा लावण्याचा प्रयत्न लेखकांनीं कां करावा हें एक आधिभौतिक गूढच आहे !

श्री. शिंदे यांचें

अगामी सामाजिक गुंतागुंतीचे

प्रश्न सोडविणारें नाटक?

लौकरच रंगभूमीवर येणार

——? ?——

# ऐतिहासिक संगीत मराठ्यांचा—मनसबदार

या नाटकाचा पहिला प्रयोग बालीवाला ग्रँड थीएटर मध्यें न्यायमूर्ति **एन. एस. लोकूर,** यांच्या अध्यक्षतेखाली ता. १६ एप्रिल १९४५ रोजीं रात्रौं ९–३० वाजतां झाला. या नाटकांत भूमिका करणाऱ्यांची नांवें:--

| | |
|---|---|
| **चंद्रा** | कु. लीला शिंगारपुरे. |
| **गिरजा** | सौ. किशोरीबाई फाटक. |
| **तापसी मीरा** | सौ. शैलजा शेट्ये. |
| **नृत्तिका** | |
| **राजाराम महाराज** | रा. के. गवाणकर. |
| **रामचंद्रपंत** | जी. एस. मोरे. |
| **सेनापति महादजा पानसंबळ** | एम्. एस्. सूर्यवंशी. |
| **सेना. संताजी घोरपडे** | रामदास नाईक. |
| **खंडा बल्लाळ** | ग. के. दातार ( कवी झेंडा ) |
| **विठूजी चव्हाण** | र. भा. शिंदे. |
| **सूर्याजी पिसाळ** | बाबूराव खोत. |
| **नागोजी माने** | बी. शंकर. |
| **करीमखां** | के. बाळकृष्ण. |
| **दाऊदखां** | शंकर जी. कदम |
| **बिनाजी** | केशवराव विचारे |
| **महंमद** | शांताराम गोडांबे. |
| **निळोजी शिपाई वगैरे** | |
| **संगीत दिग्दर्शक** | आर. एस्. चव्हाण. |
| **हार्मोनियम** | ,, ,, ,, |
| **तबला** | दामूअण्णा पार्सेकर. |
| **फिडल्** | पुरंदरे. |

या नंतरच्या स्वातंत्र्याच्या चळवळी व आंदोलनें पाहिली तर त्यांत स्वातंत्र्याचे मंदमंद कलरव देखील ऐकूं येत नाहींत. स्वार्थी पिसाळानीं स्वातंत्र्याच्या भोंवतालीं आधिदैविक, सांस्कृतिक, अवतारिक, बंधनांची इतकी वर्तुळें तयार करून ठेवलीं आहेत, कीं जनतेचें लक्ष त्या स्वातंत्र्याकडे वेधण्या ऐवजीं भोंवताली तयार केलेल्या वर्तूळावरच वेधून रहातें सूर्याजीपिसाळ एका देशमुखी करीतां पिसाळ बनला, तर आजचें स्वातंत्र्याची चळवळ करणारे स्वार्थी पिसाळ, साऱ्या जनतेच्या गुलामगिरीवर स्वार्थाच्या पोळया भाजून घेत आहेत, हें जनतेनें आतां तरी डोळे उघडून पहावे. आजच्या चळवळीच्या नेत्यांचें "स्वातंत्र्य" म्हणजे परकीय सत्तेपासून स्वतःच्या हातात सत्ता मिळवणें हें होय. आजच्या स्वातंत्र्याच्या चळवळी प्रस्तुत नाटकाचा नायक विठूजीनें म्हटल्या प्रमाणें बापजाद्यानें कमावलेल्या श्रीमंतीवर ऐत खाऊपणानें ताव मारणाऱ्या श्रीमंत लोकांच्या आहेत, आणि म्हणूनच चंद्रा (नायिका) नें म्हटल्या-प्रमाणें "हिंदुस्थानची स्वातंत्र्य लक्ष्मी रानावनात भटकूं लागलीं आहे. तिला कुठंच स्थिरता नाहीं." आजच्या स्वातंत्र्याच्या आरोळयांत मानवता नाहीं. मानवी स्वातंत्र्य नाहीं. सूर्याजी पिसाळाची पुनरावृत्ती न होऊं देतां, सध्यां सत्तापिसाळ, जनतेशीं जो विश्वास घाताचा डाव खेळत आहेत, तो हाणून पाडणारे, स्वतंत्र विचारांचे तरुण, चंद्रा सारख्या त्यागी व धैर्यशील वीर तरुणींची देशाला गरज आहे. संताजी घोरपडे सारख्या सेनानिची वस्त्रें काढून घेतलीं तरी; स्वातंत्र्य युद्धातील साधा शिपाई म्हणून लढेन, अशा विचाराचें, स्वतंत्र्य आण्याचें तरुण–तरुणी देशाला पाहिजेत. आजच्या सारखें बौद्धिक, कंगाल तरुण–तरुणी नको आहेत. व्यक्तिनिष्ठे ऐवजीं ध्येय निष्ठेला महत्व देणारे तरुण–तरुणी पुढें येतील तरच स्वार्थी पिसाळांचा नायनाट होईल, व देशाच्या क्षितिजावर स्वातंत्र्याच्या प्रभातची प्रशांत किरणें दिसूं लागतील. हिंदराष्ट्राच्या तरुण–तरुणींत

एवढी जरी जाणीव उत्पन्न झाली तरी हें नाट्यपुष्प जनतेच्या चरणावर अर्पण केल्याचें प्रस्तुत लेखकाला समाधान वाटेल.

प्रो. अ. बा. गजेंद्रगडकर यानीं आपला अमोल वेळ खर्च करून या नाटकास "प्रास्ताविक चार शब्द" लिहिण्याची तसदी घेऊन या लेखकाला उत्तेजनच दिलें नाहीं, तर त्यानीं त्याच्या समोर त्याच्या भावी जीवनाची एक उज्ज्वल ध्येयज्योत तेवत ठेवून, त्याला सदैव ऋणी करून ठेवलें या बद्दल त्यांचे कितीही आभार मानले तरी थोडेंच आहे.

सागर साहित्य मुद्रणालयाचें मालक श्री. शंकरराव कुलकर्णी आणि मुद्रणालयाचे व्यवस्थापक व स्टाफ यानीं आपली महत्वाची कामें बाजूस ठेवून थोड्या वेळांत आपुलकीनें "मराठ्यांचा–मनसबदार" चें मुद्रण करून इतक्या मनमोहक रुपांत जनते समोर ठेवण्याची सुसंधी लेखकाला आणून दिली याबद्दल लेखक त्यांचा सदैव आभारी आहे. कवि झेंडा, यांनी थोड्याच अवधींत या नाटकाचीं गाणीं करून दिली याबद्दल व संगीत दिग्दर्शक माझे बंधु, आर्. एस्. चव्हाण यांनीं तर या नाटकाच्या सजावटीबद्दल जे परिश्रम घेतलें त्याबद्दल त्यांचें आभार मानावे तेवढे थोडेच आहेत. या शिवाय ज्या ज्या माझ्या स्नेह्यानीं व सु–प्रभात नाट्य मंडळानें आपलेपणानें हें नाटक यशस्वी करून दाखविण्यांत मेहनत घेतली त्या सर्वांचें आभार मानल्या शिवाय लेखकास कधीच समाधान वाटणार नाहीं हें त्यानें सांगावें काय ?

शांती निवास,<br>
विठ्ठलभाई पटेल रोड,<br>
मुंबई ४.<br>
१–४–४५

सर्वांचा नम्र,

**र. भा. शिंदे.**

॥ श्री व्याघ्रांबरी प्रसन्न ॥

संगीत

# मराठ्यांचा-मनसबदार

## अंक १ पहिला

### प्रवेश १ ला

असो नमन तुजला प्रभुराया।
पतितपावन असशी सदया ॥ धृ ॥
सकल जिवाना दया दावुनि ॥
ठेवीं ममता तूं अनंता ॥ १ ॥
स्वातंत्र्यास्तव यज्ञ चालला।
देई यश तूं या भक्ताला ॥ २ ॥

[ **स्थळः**—रुद्रगडाच्या आसपास मराठ्यांची छावणी. संताजींचा शामियाना ]

[ **पात्रें**:—संताजी, सेनापती पानसंबळ, विठूजी, हेर, निळोजी. ]

[ संताजी आंगरख्याचे बंध बांधीत असतां हातांतून ढाल खालीं पडते. ]

**संताजी**—अपशकून! [ जखमी सेनापति पानसंबळाना शिपाई व विठूजी घेऊन येतात, व एका खाटेवर बसवितात.] सेनापति साहेब, आणि अशा स्थितींत

अेरे विठूजी, काय झालं हें ? परमेश्वरा, आमच्या मराठ्यांच्या या वयोवृद्ध अनुभविक सेनासागराला, प्रतिभीष्माला लवकर बरं कर ! आम्हांला आतां त्यांच्या शिवाय कुणीच मार्गदर्शक राहिला नाहीं. त्यांना भरपूर आयुष्य देऊन आमच्या-कडून स्वराज्यसेवा करीव !

**सेना० पान०**—संताजी ! मी पडलेला पाहून, माझ्या लोकांचा धीर खचला असेल आणि रुद्रगड शत्रूंनीं हस्तगत केला असेल. पण संताजी तूं, विठूजी आणि धनाजी मिळून, एकच रुद्रगड काय, पण असले छप्पन्न गड घ्याल अशी माझी खात्री आहे. पण, तुम्ही सारे, एकदिलानं वागलं पाहिजे. संताजी असा पुढं ये ! आतां स्वराज्याची सारी मदार तूं आणि धनाजी यांच्यावरच आहे.

**संता०**—सेनापति साहेब, आपण बोलूं नका. स्वस्थ पडून रहा. आपल्याला जास्त श्रम होत आहेत. जखमेंतून रक्त वाहणं बरं नाहीं.

**सेना० पान०**—माझं काय ! मी आतां दोन घडीचा सोबती ! अरे मरण हें कुणाला चुकलं आहे ? तें कधींतरी येणारच ! पण तें कीर्तीनं आलं पाहिजे. कीर्ति अमर आहे. संताजी, माझं या वृद्धाचं मरण काळचं निर्वाणीचं सांगणं आहे. "माझी......माझी" चंद्रा ! ती इथं लवकर येईलसं करा. आणि कदाचित् माझं......मी जर......पण कशाला ! मी आतां जगणं अशक्य आहे. माझ्या पश्चात् चंद्राला या विठूजीच्या स्वाधीन करा. संताजी, माझा हा भाचा आणि बाळ चंद्रा तुमच्या पदरांत टाकली आहेत ! अँ

**विठूजी**—मामा ! मामा उगाचच निरवानिरव करतां आहां. आपण लवकरच बरे व्हाल.

**सेना० पान०**—विठूजी थकला भागलेला जीव. जखम जिव्हारी लागल्यामुळं रक्त नाड्यांतील झरे पार आटून गेले. माणसाला जगावसं भारी वाटतं, पण जगणंच दुरापास्त आहे ! सुकलेल्या झाडाला पालवी कशी फुटणार ? रस सुकून गेला—पार सुकून गेला !

**विठू०**—मामा ! निराशा माणसाला मरणाच्या दारांत नेते पण आशा, आशेच्या नुसत्या कल्पनेनं माणूस संजीवनी असिधारांत सचैल स्नान करून आयुष्याचा मार्ग नव्या जोमानं चालू लागतो ! उगाच मनाला भिती घालून आयुष्याची दोरी नुसत्या कल्पनेनं कां तोडतां ?

**सेना० पान०**—वेड्या ! कल्पना नाहीं ती, मृत्यु ! तो पहा त्याची मंद मंद पावलं स्पष्ट ऐकूं येत आहेत. मराठ्यांच्या पाचवीला पुजलेलं मरण मराठा कधी विसरत नाहीं, पण त्या मरणालाही तितकाच तो डरत नाहीं.

**संता०**—( स्वगत ) अरेरे ! भारता ! काय तुझं दुर्दैव हें ! म्हणून महाराष्ट्र-देवतेच्या गळ्यांतील मणि, मराठ्यांचा हा भीष्म, शरपंजरी पडला !

**हेर**—( जासूद प्र. क. ) महाराज ! महाराज ! विशाळगड शत्रूनं चौफेर वेढला आहे. [ लखोटा देतो ].

**संताजी**—[ हेरानं दिलेला लखोटा वाचून ] अरेरे !ऽऽ कसलीं हीं एकेक संकट येऊन उभी राहात आहेत ! परमेश्वरा. आतां तूंच या संकटांतून स्वराज्याची नाव पैलतीरी ने. (विठूजीकडे पाहून) अगोदर सेनापति साहेबांना मोठ्या काळजीनं चंद्रगडावर पोहोंचत केलं पाहिजे. कारण, आतां तेच एक सुरक्षित असं ठिकाणं आहे.

**विठू०**—काय आहे त्या लखोट्यांत ?

**संता०**—पंतानीं लिहिलं आहे, राजकुटुंबांतील कबिले गडावर आहेत, आणि गडाला खानानं चौफेर वेढा दिला आहे. प्रसंग बाका आहे. अशावेळीं आपण लवकर मदत कराल तरच प्रसंग निभावून जाईल, आणि मराठ्यांची इज्जत राहील. पण आम्हीं येतों हें पंतांना कसं कळणार ? शिवाय धनाजीला समजावलं पाहिजे. खानानं तर मोर्चे आंवळले आहेत. धनाजीला कसंतरी कळवूं, पण पंतांना आम्हीं येतों हें कळविण्याचं काम मोठं कठीण आहे. आम्हीं पोहोंचण्या अगोदर किल्ला जर खानानें सर केला तर मोठंच संकट गुदरणार म्हणायचं !

**विठू॰**—आपली आज्ञा होत असेल, तर पंतांना कळवायला गडावर मी स्वत: जातों.

**संता॰**—भले बहाद्दर! ही जोखमीची कामगिरी मी तुझ्यावर सोंपवतो. (लखोटा लिहून देतो.) हा लखोटा, उद्यां सूर्योदयापूर्वी पंतांच्या हातीं पोहोंचला पाहिजे. मार्गांत गडाच्या चौफेर खानाच्या सैन्याचा गराडा पडला आहे. तरी जिवाची तमा न बाळगतां लखोटा पंतांच्या सुपुर्द कर. आणि यदाकदाचित् शत्रुच्या हातीं सांपडलास, तर लखोटा मात्र त्यांच्या हातीं मिळूं देऊं नकोस. शत्रु सावध होईल. पंतांची भेट होतांच त्यांना सांग, तीन दिवस पर्यंत गड शिकस्तीनं लढवा. चौथ्या दिवशीं मी आणि धनाजी, गडाच्या दोहोंबाजूनं खान बेसावध असतां हल्ला करतों.

**विठू॰**—पण चंद्रा, चंद्रगडावर येण्याची काय व्यवस्था?

**संता॰**—त्याची नको तुला काळजी! निळोजीला पाठवून ती व्यवस्था मी करतों. म्हातारा विश्वासू आहे.

**विठू॰**—कोण निळोजी आण्णा! ते तर आमच्या नात्याचेच. चंद्राच्या सावत्र आईच्या बहिणीचा नवरा.

**संता॰**—ठाऊक आहे मला. विठूजी, ही महत्त्वाची कामगिरी करून परवां सूर्यास्ताच्या आंत तोरणीच्या सड्यावर माझी गांठ घे.

**विठू॰**—तोरणीच्या सड्यावर कुठेसा भेटूं?

**संता॰**—ब्रह्मेंद्रस्वामींच्या गुहेत. पण उशीर होतां कामा नये. तुझ्या आवडत्या जनावराकडे पाहूं नको. सूर्यास्तानंतर माझी भेट तुला होणार नाहीं.

**विठू॰**—सूर्यास्तापूर्वी येतो खात्री असूं द्या.

**संता॰**—संताजी भलत्या सलत्या माणसावर कधींच विश्वास ठेवीत नाहीं, हें लक्षांत असूं दे.

**विठू॰**—तुमच्या पायाची आण! चव्हाणाच्या कुळाची इज्जत! आणि मायदेशाचें पावित्र्य, हा सेनापति पानसंबळाचा भाचा आपणांस पटवून देईल

**सेना॰ पान॰**—( कष्टानें उठून ) भले बाघा ! ह्या वृद्धाचा तुला आशिर्वाद आहे. माझी बहीण कृष्णा यावेळीं असती तर तिला किती आनंद झाला असता असला चित्त्याच्या तडफेचा मुलगा पाहून !

**संता॰**—विठूजी, जातिवंत मराठ्याच्या शब्दाची किंमत त्याच्या आणभाकेपेक्षां खास कमी नाहीं. पण—

**विठू॰**—समजलों, मराठ्यांच्या दौलतीला लागलेली कुसंपाची कीड म्हणजे आपसांतील दुही ! स्वार्थीपणाची लालसा कधीं घात करील त्याचा नेम नाहीं.

**संता॰**—जा. आंखल्या कामगिरीला उशीर नको.

**विठू॰**—हा निघालों पहा. ( मुजरा करून जातो ).

**संता॰**—जा ! जा ! मराठ्यांच्या फाकड्या शिलेदारा ! हातीं घेतलेली कामगिरी फत्ते करून आलास, तर हा संताजी तुझा गौरवच करील. अरे, निळोजीला इकडं पाठवून दे. ( निळोजी प्र. करतो. ) निळोजी, जा आणि माझा घोडा जीन घालून तयार ठेव. तसंच सेनापति साहेबासाठीं राघू नायकाला मेणा तयार करायला सांगून, तो चंद्रगडावर सुखरूप पोंहोंचता करण्याची तुम्ही जातीनं व्यवस्था करा.

**निळोजी**—पण सरकार, आसपास शत्रु सैन्याचा गराडा पडला असतां, चंद्रगडावर जाण्याचा मार्ग बंद झाला आहे त्याचं काय ?

**संता॰**—त्याची नको तुम्हांला काळजी. जा तुम्हीं, आपल्या कामाला लागा. आई जगदंबे ! सेनापति साहेबासारखा मोहरा आज आम्हांला अंतरणार तर नाहींना ? थोरल्या महाराजांच्या कारकीर्दींत, शिपायाचा सेनापति होऊन, ज्यानं आपल्या अलौकिक शौर्य चातुर्यानं स्वराज्याच्या श्रीगणेशाची उजळणी केली, अविश्रांत श्रमानं महाराष्ट्राची सेवा करून, आमच्या सारखे हजारों योद्धे ज्यानं तयार केले, असा आमचा नेता, जर आज आम्हांला अंतरला तर, या जगांत

आमच्या सारख्या अननूभवी तरूणांचा मार्गदर्शक कोण राहिला ? परमेश्वरा ! आमच्या महाराष्ट्राच्या या प्रतिभीष्माचं आतां तूंच रक्षण कर, आणि आम्हां सर्वांकडून स्वराज्यसेवा घडीव.

[ पडदा पडतो ]

प्रवेश १ पहिला

समाप्त

# अंक १ पहिला



## प्रवेश २ रा



[ **स्थळ:**—रस्ता. ]

[ **पात्रें:**—बिनाजी, गिरजा, विठूजी. ]

[ बिनाजी शीळ घालीत प्रवेश करतो. ]

**बिना०**—आग ऽ ग ऽ ग ऽ कोन गिरजा तूं व्हय ? म्या म्हंगालों हें म्यालेल्या मड्यावानी चाललंय कोन ? पान्यावर चाल्लींसा व्हय ? चाल की बिगी बिगी !

**गिरजा**—व्हय ! व्हय ! मांज्या मनाला इल तसी म्या चालनं, तुला काय करायची रं ?

**बिना०**—अग ऽ ग ऽ ग ऽ ! तसं न्हवं ! अग पंतांची भ्याट घेन्यापायीं, योक शिलदार जनावराचं पानी पानी करूनशान खानाच्या गोटानजीकनं आलाय पग. त्यो पग ! त्यो पग ! कसा फाकड्या हाय ! आहारे मर्द ! अग खानाच ल्वॉक पांचपन्नास मागं लागल्याती तेच्या. असा गुंगारा दितुय कीं, जसा म्यां दितुय तुला !

**गिरजा**०—( वेडावून ) ॲ हॅ हा ऽ ऽ ! त्वाँड पघा ! म्हनं म्यां गुंगारा दितुय तुला !

**बिना**०—अग पर, किल्लदारास्नी सांगाया जातुय न्हवं कां ?

**गिर**०—मग हिकडं कशापायी आलास रं ? बिचारा काय कामगिरी घेऊन आला असल ? खानाच ल्वॉक लागल्यात त्याच्या पाठीमागं. गडकऱ्यास्नी सांगून, त्येला अदुगर आमंदी घेन्याचं सोडूनशान्, यंव झालं नि त्यंव झालं म्हनुन सांगाया आलायस व्हय रं ?

**बिना**०—कशापाई म्हंजी ! तुलाच पघाया आलो न्हव का !

**बिनाजी**०—तूं माज्या जिवाची मैतरीन ।
तुला पघून माझा जीव आला कसा
मोहरून मोहरून ॥

**गिरजा, बिनाजी**०— ,, ,, ,, ,,

**बिनाजी**०—आम्ही शूर शिपाही गडी ।
तरवार बांधतो कटी कशी फांकडी ॥

**गिरजा**०—तिच पानि पघून जैसा वैरी होई घाबरा

**बिनाजी**०—मी तसाच तुझ्या नजरने पघ झालो बावरा ॥ १ ॥

**बिनाजी**०—कधीं होईल आपल लगीनं

**गिरजा**०—अन् खेळूं दोघच पिरतीनं ॥ २ ॥

**गिरजा**—आतां जातोस का ?

**बिना**०—न्हाई, म्हंजी त्यो दिसतुय अगदीं इदुजीसारखा ! त्याला मोठमोठं कल्लं अन् ह्यो मिशीचा आकडा !

**गिरजा**--ह्यो मिशीचा आकडा ! जा अदुगर किल्येदारास्नी सांग तंवर म्या घागार भरून आनते. जा की !

**बिना०**--अग ऽ ग ऽ ग ! पर एखाद्याच्या आंगावर अशी वस्कन काय यितीस ? जनु डोंबाऱ्याची अस्वल इती तशी !

**गिरजा**--मला अस्वल म्हन्तुइस व्हय रं ? (ती त्याच्या पाठीस लागते, तो पळतो.)

**विठूजी**--(प्रवेश करतो) शुक् ! शुक् !

**गिरजा**--कोन रं तूं ? कुनाला शुक् शुक् करतुयास.

**विठू०**--म्हंगालों तुम्हालाच ! ॲऽहॅं ! पान्याला चाललायसा व्हय ?

**गिरजा**--व्हय व्हय ? कां बरं कोन हवं तुम्हास्नी ?

**विठू०**--मला व्हय ? तुम्हीच ! तुमच्यापाशीं काम हाय थ्वॉड.

**गिरजा**--काय काम हाय ? माज्याशीं तुमचं ? बोला लवकर, मला येळ व्हतुय.

**विठू०**--ॲं ? कुठं लडायवर जातायसा व्हय ? केरसुनी तर दिसत न्हाई हातांत !

**गिरजा**--काय र ए ! न्हाव्यावानी कमरला धलपाटनं लावून, म्हराट्याच्या पॉरीची थट्टा करतुयास व्हय रं ? (घागर घेऊन त्याच्यावर धावून जाते. बिनाजी प्र. क.)

**बिना०**-- हान् ! हान् ! हान, लेकाच्या टकुऱ्यांत ! म्यां म्हंगालों ह्यो ग्येला कुटं ? काय र ए ऽ ! घोड्यावरच्या शान्या ! म्हराट्याच्या पोरीची अशी बेअदब करतोस ? मुंडकी उतरून ठेवीन खालीं ! लेका, ह्यो बिनाजी पठ्या असा तसा न्हाई ! अर, हिच्यासाठीं ह्यो बिनाजीराव वाटल तें कराया डरणार न्हाई समजलास ?

**विठू०**--(तलवार उपसतो; बिनाजी घाबरून गिरजेच्या पदराआड लपतो) चल ए पट्टया ! माझी मुंडकी उतरतुस व्हय रं ?

**बिना०**--न-न-न-न नाय ! शि-शि-शिलदार साहेब ! मला जगायंचं हाय ना हिच्यासाठीं !

**गिरजा**--अहा ऽ रे भागुबाई ! मला जगायंचंय हिच्यासाठीं ! कशाला जगतायसा ? लडतां लडतां मेलायसा तर मुडद्यासंग लगीन लावीन तुमच्या ! पर जिवंत असून, मेल्यागत असलेल्या शेंदाड शिपायाशीं लगीन लावाया अडलंय माझं खेटार !

**बिना०**--अग ऽ ग ऽ ग ! काय वंगाळ बोलतियास ? मुडद्यासंग लगीन कुनी लावलंय कां हो राव ? तुम्हीच सांगा हिला !

**विठू०**--अर, लग्नाबिगर म्यालेल्या माणसाचं लगीन रुईच्या झाडासंग लावत्यात कीं !

**बिना०**--अवों पर ! असं काय येड्यावानी सांगतायसा तिला ? मरून रुवाशीं लगीन लावन्यापरास मीच हिच्याशीं लावलं तर ?

**विठू०**--अर ए ! तुमच्या लग्नाच्या घाईत ह्यो पट्टया उपाशीच राहील. गिरजा, चल अगुदर घरीं आणि ह्या विठुजीला भाकर वाढ. भुकेनं जीव अगदीं बेजार झालाय ! (मिशा, कल्ले काढतो.)

**गिरजा**--बाई ! बाई ! बाई ! कोन इठूदादा ? तुमी तर आम्हास्नी अक्शी बेजार केलंत न्हवं ? अवो !, कवापास्न आम्हास्नी वळख बी न्हाई दिलीत !

**बिना०**--अग, ग, ग ऽ ! काय दादाचा फुटलाया पान्हा ! मघां घागर टकुऱ्यांत घालीत व्हतीस न्हाय ? ह्यो बिनाजीराव नसता तर--

**विठू०**--काय लेका थापा मारतो आहेस ! मघां तूंच तिला सांगत होतास कीं, हान्-हान्-लेकाच्या टकुऱ्यांत ! एखाद्या सरदाराचाच आव आणला होतास की ? बायकोच्या पदरा आड लपून, नथींतून तीर मारणारा तिरंदाज खरा ! आणि म्हणे मी हेर आहे !

**बिना०**—अर हेर न्हाई, हेराचा बा हाय ह्यो पठ्ठ्या! काय रं! काय समजतुयास तूं मला? अर म्यां हेर झालों म्हून तूं मोठा शिलदार न्हवं-सरदार झालास! न्हाईतर! .........

**विठू०**—तूंच सरदार झाला असतास, असंच ना?

**बिना०**—न्हाईतर काय! अर म्हाराज म्हंगालं, हेराचं काम करावं, तर म्यांच! अक्शी भइरजी नायकावानी!

**गिरजा**—कशाला र थापा मारतोस ह्या? अर, कांदाभाकर खायला समजत न्हाई तुला, तर तूं लागलायसा सरदाराच्या ग्वॉष्ठी करायला!

**बिना०**—म्हंजी तूं काय समजतीस ग मला? म्यां म्हंजी काय म्याल्यालं मढं हाय व्हय?

**विठू०**—अरे मेलेलं मढंसुद्धां कधीं कधीं उठून तुझ्यासारख्याच्या मानेवर बसेल.

**बिना०**—(घाबरून) अर क-क-का-काय म्हनतुयास काय? (भितो).

**गिरजा**—अहारे मर्द! मेलेल्या मुडद्यावानी काय दांत इचकून लटलटा हालतुयास असा!

(राग पिलू-कव्वाली)

**लई भितरा दिसशी खरा**
**पर आव आणिशी जणु शुरा**
**नग दाऊ उगा हुशारी**
**हि लटकी दिसे वरि वरि**
**मर्दपणा हा नाहीं बरा**

**बिना०**—अग ऽग ऽग! अशी वराडतीस काय? अक्शी डाकिनीवानी? अगुदर घरला चल, त्याला भूक लागली असल, काय र पावन्या!

**विठू॰**—व्हय ! व्हय ! पावन्ह्या ! चल गिरजा खरोखरच मला भूक लागली आहे. जेवण उरकून आपण संताजीदादाकडं जाऊं तोरणीच्या सज्यावर.

**गिरजा॰**—चला ! म्या येत्ये घागर भरून. [पडदा पडतो]

प्रवेश २ रा

समाप्त

# अंक १ पहिला

## प्रवेश ३ रा

[ **स्थळ:**—जंगल, डोंगराळ, झाडी ]

[ **पात्रें:**—चंद्रा, गहिनाजी, सूर्याजी पिसाळ, विठूजी. ]

**चंद्रा॰**--गहिनाजी, तूं सांगतोस त्याच वाटेनं आपण जात आहोंत ना ? नाहींतर भलताच एखादा......

**गहिनाजी॰**--छे ! छे ! छे ! भलतंच ! ह्योच रस्ता थेट चंद्रगडाकडं जातोय नव्ह का ?

**चंद्रा॰**—मग चल तर लवकर. संध्याकाळच्या आंत आपल्याला गडावर गेलं पाहिजे.

**गहि॰**--पन् म्हंगालों, जरा इथं थ्वॉडा येळ इश्रांति घेऊं अन् धरूं गडाचा रस्ता ! आज सकाळ पास्नं भाकरीचा तुकडा अन् घ्वाटभर पानी बी न्हाई गेलं आपल्या प्वाटांत !

**चंद्रा॰**—मला अजून भूकहि लागली नाहीं आणि पाणी प्यायला इथल्यापेक्षां तोरणीच्या सज्यावर जाऊं. तिथं पाटलाकडं थोडा वेळ विश्रांति घेऊन, चंद्रगडाची वाट धरूं.

**गाडि॰**—असं म्हनतायसा व्हय ? पर-तायसाब थत पल्याडल्या बाजूला कोनसं गेल्यावानी वाटलं......पघतों हं थत जाऊन. ( जातो. )

**चंद्रा॰**—मलाही तसाच भास झाला खरा. कोण बरं गेलं असावं ! ( सूर्याजी येतो ).

**सूर्याजी**—अ-हँ ! कोण ? सेनापति पानसंबळांची चंद्रा ! अन् अशा आडरानांत ?

**चंद्रा॰**—कोण ? किल्लेदार साहेब आपण ? मला वाटलं एखादा रानडुकर गेला असेल म्हणून. किल्लेदार काका—

**सूर्या॰**—हें पहा चंद्रा, आतां किल्लेदार, किल्लेदार म्हणून मला कशाला हिणवतेस ?

**चंद्रा॰**—पण आपण इकडं कुठं ?

**सूर्या॰**—तो संताजी आणि तुझा तो आतेभाऊ विठूजी चव्हाण, सारखे माझ्या मागावर आहेत. त्यांच्या तडाक्यांतून जीव वांचवावा म्हणून असल्या दरीखोऱ्यांतून भटकतो आहे. बाकी श्वापदांनीं चटणी केली नाहीं म्हणजे बस्स !

**चंद्रा॰**—अरेरे ! काय तुमची ही अवस्था ! कशी दुर्बुद्धी झाली तुम्हांला त्या वाईच्या देशमुखीची. पिसाळ, तुम्हांला काय कमी होतं ! मराठ्यांची राजधानी तुमच्या स्वाधीन होती; रायगडची किल्लेदारी वांईच्या देशमुखीपेक्षां कमी वाटावी ना ?

**सूर्या॰**—हें पहा चंद्रा, तें तुला नाहीं कळायचं. तुझ्यासारख्या बायका-पोरींनीं राजकारण करायचं, मग आमच्यासारखे त्यांतील मुरब्बी ह्या असल्या आडरानांतच बरे

**चंद्रा॰**—राजकारण, आम्हां मुलींना काय कळणार ? बाकी तुमच्या एक-ट्यांच्या लालुचकरणीनं, मराठ्यांची राजलक्ष्मीं रानावनांत भटकूं लागली तिला कुठंच स्थिरता नाहींशी झाली आहे. आपण जर विश्वासघातासारखी कसाबकरणी केली नसती तर ?

**सूर्या**०—तुझं म्हणणं सत्य आहे. केल्या कृत्याबद्दल मला भारी पश्चात्ताप होत आहे. पण आतां काय त्याचं ? ना घर, ना दार फितूर म्हणून साऱ्या महाराष्ट्रांत निवाऱ्याची जागा नाहीं ! केव्हां जीव जाईल, त्याचा नेम नाहीं. मी मरणाला भितों, असा तूं आपला समज करून घेऊं नकोस. फितुरीचा काळा डाग पश्चातापच्या दग्ध होमकुंडांत जाळून, पुन्हां स्वराज्याची सेवा करावी, अशा मनांत मनिषा बाळगली, पण व्यर्थ ! फितूर तो फितूर ! त्याच्यावर कोण भरंवसा ठेवणार ?

**चंद्रा**०—असं कसं म्हणतां ? थोरल्या महाराजांच्यावेळीं, शंभूराजे नव्हते का बादशाहाला फितूर झाले ? पण त्यांना केल्याकृत्त्याचा पश्चात्ताप झाला आणि ते पुन्हां स्वराज्याची सेवा करूं लागले.

**सूर्या**०—वेडे पोरी ! कशाला असलीं उदाहरणं सांगतेस ? कुठं तो दैवी पुरुष प्रत्यक्ष सांबाचा अवतार, आणि त्याचा तो कारटा आडदांड संभ्या ! संभ्यासासारखे आडदांड राक्षस राजे झाले म्हणूनच माझ्यासारखा जातिवंत मराठा विश्वासघातकी निमकहराम बनला.

**चंद्रा**०—पण अजूनहि मराठ्यांच्या पांचवीला पूजलेला इमानी बाणा जगाला पटवून देतां येईल. निंबाळकर तरी......

**सूर्या**०—निंबाळकर ! बडा सरदार होता, शंभूराजे राजे होते, तर हा सूर्याजी पिसाळ साधा शिपाई गडी आहे.

**चंद्रा**०—शिपाई गड्यांचीं सुद्धां हजारों उदाहरणं देतां येतील. धर्मबाह्य झालेले सुद्धां आपलेसे करून घेतले, मग आपण तर हाडाचे नेकजात आहांत. खरोखरच जर आपलं मन पालटलं असेल, तर मी विठूजीजवळ आपल्याविषयीं बोलणं काढीन, आणि बाबानांही सांगेन आज चंद्रागडावर गेल्यावर.

**सूर्या**०—काय ! विठूजीला आणि पनसंबळांना सांगशील ? म्हणजे माझा आतांच घात करण्याचा तुझा विचार दिसतोय !

**चंद्रा**०—छे, छे ! असं मनांत सुद्धां आणूं नका. विठूजी, इतका कांहीं निर्दय नाहीं खास !

**सूर्या०**—अग पोरी, मी त्यांना ओळखीत नाहीं, असं कां तूं समजतेस? पिसाळ कुठंहि मिळाला तरी त्याचा जीव घेण्यास तें त्रिकूट कमी करणार नाहीं.

**चंद्रा०**—मराठ गादीची एक निष्ठनं शपथ घेतल्यावर मग तो कुणी कां असेना तो त्यांचा मित्र-बंधूच होतो अशी माझी खात्री आहे. आणि या उलट वागणारा तो अस्सल जातीचा मराठाच नव्हे, असं मी म्हणेन.

**सूर्या०**—हे पहा चंद्रा, आपण असल्या अडचणीच्या जागीं किती वेळ उभं राहाणार? जवळच वरच्या बाजूला माझी राहाण्याची गुहा आहे; तूंही दमली भागली आहेस, थोडा वेळ विसांवा घे, स्वच्छ पाणी पी, आणि मग धर चंद्रगडाची वाट!

**चंद्रा०**—नाहीं पिसाळ, मला सांजपावेतों गडावर गेलंच पाहिजे, आणि म्हणूनच या, गहिनाजीला विठूजीनं पाठविला आहे होय ना रे गहिनाजी? अगबाई! पण हा गेला कुठं? गहिनाजी अरे गहिनाजी.

**सूर्या०**—कशाला उगाच त्याला ओरडतेस? हा गहिनाजी विठूजीनं पाठविलेला माणूस नसून तो माझा साथीदार आहे.

**चंद्रा०**—म्हणजे? गहिनाजी! अरे गहिनाजी! गहिनाजी! कुठं गेला हा?

**सूर्या०**—(हंसून) बाकी स्त्रियांची जात भित्री खरी. (भकास हंसतो) हैं, हॅ, हॅ! गहिनाजी!

**गहिनाजी**—(प्र. क.) सरकार!

**चंद्रा०**—काय रे मेल्या, मला विठूजीचं नांव सांगून अशी फसवून इथं आणलीस काय, चांडाळा! (मारायला जाते. सूर्याजी आडवा येतो.)

**गहि०**—जी व्हय तायसायब!

**सूर्या०**—चंद्रा, तें त्याला नाही कळायचं, मीच सांगतों तुला, अगोदर वर गुहेंत चल म्हणजे आपोआपच कळेल तुला सर्व.

**चंद्रा०**—काका, बेजबाबदार वर्तन ठीक नाहीं. बऱ्याबोलानं खरं काय तें सांगा, मला असं फसवून इथं कां आणलंत ?

**सूर्या०**—गुलजार गुलबा, असं रागानं फोफाऊं नकोस ! पाकळ्या गळून पडतील. मग—शोभा काय त्याची ! किंचितशी वायूची लहर तुझ्या कोमल देह-वल्लरीला सोसणार नाहीं, म्हणून म्हणतों तुझ्या जिवाखातर मी माझ्या देहाची ढाल करीन.

**चंद्रा**—पाजी नादान माकडा ! माझ्यासारख्या कुमारीकडे विषारी नजर फेंकणाऱ्या विषयांध मांगा ! तुझ्या डोळ्याच्या खांचा कशा नाहीं झाल्या.

**सूर्या०**– काय गोड बोललीस, आलमगीर बादशहानं तीच शिक्षा मला फर्मावली होती, पण माझ्या सुदैवानं त्या वेळ्या येसूनं मराठ्यांच्या महाराणीनं त्यांतून माझी सोडवणूक केली आणि म्हणूनच आज तुझं दर्शन झालं. पोरी, आत्तांच्या या सायंकिरणानीं तुझ्या या नाजूक कपोलावर चढलेल्या लालीमुळं तुझं सुंदर मुखकमल कसं रक्तवर्ण .....

**चंद्रा०**—बस्स कर हा लाळघोटेपणा ! कुणापुढं असले पाजीपणाचे प्रलाप काढतो आहेस याची शुद्ध आहे का तुला ? निर्लज्ज ! मी मराठ्यांच्या सेनापतीची पानसंबळांची मुलगी आहे, हें तुझ्या ध्यानांत आहे ना ?

( राग. नटनारायण–एकताल )

**लाजनाहींतुला। सेविसी परक्याला ॥ ध्रृ० ॥**
**महाराष्ट्रा जन्म घेसी। देश द्रोह हा करसी ॥**
**काय लाभ मिळविसी। धिक् धिक्-तव जन्म तुला ॥ १ ॥**

**सूर्या०**—बकवा बंद कर ! मराठ्यांच्या सेनापतीची डर या सूर्याजी-पिसाळाला दाखवूं नको ! हॅं, हॅं, हॅं, ! गहिनाजी पहातोस काय ? या लुसलुशीत घोडीला टाक कांडणी न् चल वर गुहेंत घेऊन ! बेलगाम जनावरं अशीच थयथयाट करतात. [गहिनाजी तिला धरायला जातो ती मारते तो बाजूला होतो.] काय नाहीं ऐकत ?

**चंद्रा०**—मेल्या नादान मर्कटा, ! एक पाऊल पुढं टाकशील, तर माझ्या पावित्र्याखातर......

**सूर्या०**--कोण येणार आहे तुझं पावित्र्य रक्षण करायला अशा या आडरानांत ?

**चंद्रा०**--आजपर्यंत हिंदु म्हणून जगलास, आणि आर्यस्त्रियांची अब्रू-रक्षणकर्ता तुला ठावूक नाहीं थुः तुझ्या हिंदुपणावर ! ज्यानं कौरवांच्या भर दरबारांत द्रौपदीला वस्त्रं पुरवलीं, सखूच्या हांकेला धांवून आला, कान्होपात्रेला आपल्या पदीं अढळपद ज्यानं दिलं, तो माझा भगवान !

**सूर्या०**—पोरी, आर्यमहिलांच्या गोष्टी, मला सांगूं नकोस, हें कलियुग आहे. मुकाट्यानं वर गुहेंत चल.

**चंद्रा०**—तुझ्याबरोबर येण्यापेक्षां, तो पाहिलास मृत्यूचा भयंकर खोल जबडा [ खोल ओढ्याकडे बोट दाखविते ] याची मला अखेरची मदत होईल.

**सूर्या०**—पण तुला जाऊं कसा देईन मी एकदां मनाला शांत केल्या-शिवाय [ तिला धरायला जातो, विठूजी उडीसरसा येतो. ]

**विठू०**—तुला कायमचा शांत करायला हा पाहा, तुझा मृत्यु जवळ आला. [ त्याला पाहून सूर्याजी व गहिनाजी पसार होतात. ]

**चंद्रा**—अगबाई ! कोण माझा विठूजी ? माझ्या देवानं माझा धांवा ऐकला !

**विठू०**—जीव घेऊन पळालास म्हणून जीवें वांचलास, नाहीं तर खांडोळी केली असतीं. तरी पण तूं सुटलास असं समजूं नकोस. [ चंद्राकडे पाहून ] पण चंद्रा. कसला विचार मनांत आणला होतास तं ?

**चंद्रा०**--केवळ पावित्र्याखातर विठूजी !

**विठूं०**—भित्र्या दिलाच्या मनाची गोष्ट झाली ती. भाविक भक्तांचा पाठिराखा ईश्वर असतां, त्यांनीं अविचारांची कांस कां धरावी ?

**चंद्रा०**—पण बाई, तूं एकाएकीं कसा आलास तें नाहीं सांगितलंस मला ? कां देवानंच धाडला तुला ? नाहींतर असल्या किर्‌ऽऽरानांत......

**विठू०**—इथंच पलिकडच्या बाजूला ब्रह्मेंद्र स्वामींची गुहा आहे, तिथंच संताजीराव दादा मला भेटणार आहेत, म्हणून मी तातडीनं आलों त्यांना भेटण्यासाठीं. थोडा अवकाश होता, शिवाय स्वामी याच बाजूला गेले आहेत असं त्यांच्या शिष्यानं सांगितलं. या बाजूची ही नयनरम्य वनराजी, तसंच टप्या टप्यानं उड्या टाकीत जाणारं ओढ्याचं फेसाळ पाणी, मनाला मोह पाडण्यासारखं आहे. माझ्या मनाला तसंच कांहीं झालं पुढं चालतां, चालता ओढ्याकांठीं आलों वाटलं थोडं पाणी प्यावं, म्हणून पाण्यानं ओंजळ भरणार तों कुणी माणसं बोलल्याचा भास झाला पुढं येऊन पाहातों, तो हा प्रसंग पण तूं इकडं कशी ? आणि निळोजी आण्णा कुठं आहेत ? तुला चंद्रगडावर पोहोंचविण्यासाठीं निळोजीनाच संताजीदादानं पाठवलं होतं.

**चंद्रा०**— त्या मेल्या मांगानं—गहिनाजीनं, सूर्याजी पिसाळाच्या सांगण्या-वरून मला इकडं फसवून आणलं ! निळोजी आण्णांचं काय केलं कुणास ठावूक ? गफलतीनं आण्णांचा घात तर केला नसेलना ? नेम काय ! मेले कसायी हे! त्यांच्या शोधासाठीं बिनाजीला पाठविलं पाहिजे.

**विठू०**—बिनाजी माझ्या पाठोपाठ स्वामींच्या गुहेकडे येणार आहे त्यालाच पाठवूं.

**चंद्रा०**—असल्या दऱ्याखोऱ्यांतून स्वामी सारखीं थोर माणसं राहतात.

**विठू०**—आणि तिथंच आजूबाजूला पिसाळासारखे काळसर्पहि राहातात खरं ना ?, चंद्रा, आपल्याला इथं फारच वेळ झाला; नाहीं ? चल अगोदर गुहेंत जाऊन स्वामींचं दर्शन घेऊं, तोंवर संताजीदादाहि तिथं येतील.

**चंद्रा०**—पण असल्या कड्यावरून पलीकडे कसं रे जायचं ? तूं आपला जाशील उडी टाकून.

**विठू०**—अग मी उडी टाकीन, तिथं तुलाहि टाकायला नको का ? या विठूजीची...शिवाय मराठ्यांच्या मुली अशा भित्र्या भागूबाई कधींपासून झाल्या ? चल धर ती वेल घट्ट धर. ( दोघं वेलीजवळ जातात. )

**प्रवेश ३ पहिला**

**समाप्त**

# अंक १ पहिला

## प्रवेश ४ था

[ **स्थळ:**—रस्ता-जंगल ]

**पात्रें:**—संताजी, विठूजी, चंद्रा, बिनाजी, गिरजा,

**संताजी**—पंताकडं गेलेल्या विठूजीचा पत्ता नाहीं, यावरून काय समजावं ? विठूजीची आणि पंताची भेट झाली कीं, मध्येंच शत्रूच्या हातीं सांपडून सारा व्यूह ढांसळला, कांहींच कळायला मार्ग नाहीं. ( तुतारी वाजवतो ) अरे, पण हा कोण येत आहे ? माझा विठूजीच वाटतं, आणि ती, कोण चंद्रा ? हो चंद्राच. ( विठूजी प्र. क. ) विठूजी ये. अगदीं वेळेवर आलास पण चंद्रा कुठं भेटली तुला ?

**विठू०**—त्या बेईमान सूर्याजी पिसाळाचीच ही कारवाई ! गहिनाजी नांवाच्या शिपायाकडून माझं खोटंच नांव सांगून तिला इकडे घेऊन आला.

**चंद्रा०**—इतकंच नव्हे तर इथं आणण्यांत त्याचा कांहींतरी मोठाच डाव होता; पण ऐन प्रसंगीं विठूजीनं माझी सुटका केली, नाहींतर......

**संता०**—पण त्याला जिवंत कसा जाऊं दिलांत तुम्हीं ?

**विठू०**—पुन्हां चंद्राला एकटीच सोडली, तर दुसरंच एखादं संकट गुदरायचं ? शिवाय आपण सांगितल्याप्रमाणं सूर्यास्ताच्या आंत हजर राहात येणार नाहीं म्हणून त्याला जाऊं दिला.

**संता०**—बरं पण पंतांचा कांहीं हुकूम ?

**विठू०**—आपण सांगितल्याप्रमाणं गड लढवतों, तोंवर आपण धनाजी-रावासह येऊन, खानावर हल्ला करा, आणि स्वराज्यसेवा करा, असाच त्यांचा हुकूम आहे.

**संता०**—ठीक आहे.

**विठू०**—आणखी बिनाजीसह मान्यांच्या गढींत जाऊन, पिसाळ व मान्यांच्या हालचालीवर, मला नजर ठेवायला सांगितलें आहे. या नागोजीचं आणि सूर्याजी पिसाळाचं पिसाट मुळासकट उखडलं पाहिजे असं पंत म्हणाले. हा काळसर्प जिवंत असेतोंपर्यंत कुणाकुणाला चावे घेईल, त्याचा नेम नाहीं. सध्या त्याचं बस्तान फितूर मान्यांच्या गढींत असतं, असं बिनाजी मला सांगत होता.

**संता०**—काय ! पिसाळाचं बस्तान मान्यांच्या गढींत असतं ? मग मग असल्या निमकहरामांना अगोदर ठेंचलंच पाहिजे. नाहींतर केव्हां घात करतील त्याचा भरंवसा नाहीं.

**चंद्रा०**—या सूर्याजी पिसाळानं मराठ्यांची राजलक्ष्मी रखडती केली आणि मिळवलं काय, तर कैदखाना !

**संता०**—अन्नपाण्यावांचून कुत्र्याच्या मोतीनं मारला असता अलमागिरानं; पण राणी येसूबाईच्या सांगण्यावरून त्या बादशाहाच्या पोरीनं, आपल्या वजनानं मोकळा केला. अलमगिराच्या बंदीखान्यांत सुद्धां, राणीसाहेबांनीं त्याला आपल्या दिमतींत घेतला, पण हा निमकहराम शेवटीं आपल्या वळणावर गेला, आणि दग्यानं, दख्खनांत आला; पण त्या निमकहरामाला म्हणावं, हा संताजी घोरपडे तुमचं पिसाट उतरल्याविना खास राहणार नाहीं. विठूजी, तूं असाच जा, आणि बिनाजीला म्हणावं, त्यांच्या हालचालीवर नीट नजर ठेव.

**विठू०**—हा पहा चाललों; पण दादा तो पहा बिनाजीच इकडं येत आहे, ( बिनाजी येऊन मुजरा करतो. )

**संता०**—बिनाजी, म्हसवाडच्या आसपास राहून, सूर्याजी पिसाळ आणि मान्यांकडची हकिगत घेऊन ये. सूर्याजी पिसाळ, मान्यांच्या गढींत असतो, असं तूंच विठूजीला सांगितलंस नव्हे का?

**बिना०**—ये-ये-व्हय जी! त्या दिशीं पिसाळासंग सा आसामी व्हत; न्हाईतर म्यांच घातली असती झडप—

**विठू०**—भल्या मर्दा बोलतांना बिब्ब्या चित्त्याचा आव आणतोस, आणि आंगावर बेतली कीं, मग करतोस तिथून पोबारा!

**बिना०**—आरं येऽ! माझी हेटाळणी करतोस व्हय रं? यळ आली, तर तुज्यासारखं धा-पांच लोळवीन एका झटक्यासरसं! पण मला जगायचं हाय ना हिच्यासाठीं, म्हून नगा! [ गिरजा प्र. करते. ]

**चंद्रा०**—तुला जगायचं आहे, आणि आम्हांला काय मरायचं आहे. होय रे बिनाजी?

**बिना०**—न्हाई......म्हंगालों या गिरजेसाठीं!

**संता०**—बरं विठूजी चल अगोदर गुहेंत जाऊन स्वामींचं दर्शन घेऊं आणि आपण आपापल्या कामगिरीवर जाऊं.

**विठू०**—गिरजा, स्वामी आहेत ना गुहेंत? (ती मानेनं होय म्हणते.) मग चला तर लवकर. चल चंद्रा. (बिनाजी व गिरजा खेरीज जातात.)

**गिरजा**—काय रं. मला सोडून माज्या अगुदर हितं आलास त्यो काय मिळवलंस रं? तकडं स्वामींच्या पायापाशीं न्हावून, सेवाचाकरी करायची टाकून, इथं लाळ घोटेपणा कराया आलास व्हय ?

**बिना०**—आग तसं न्हवं! तुला इचारलं म्हंजी बरं!

**गिरजा**—काय इच्यारायला आलास रं!

**बिना०**—तरन्या पॉरी म्हॉरं दुसरं काय इच्यारायचं असतं ग?

**गिरजा**—लय जिबली वळवळतिया रं तुझी ?

**बिना०**—पक्वान मायंदाळ अन् सुरेक असल्यावर वळवळायचीच ती !

**गिरजा**—आक्सी सरदारवानी बोलतुयास न्हवं !

**बिना०**—सरदारीन व्हन्याचा इच्यार हाय ना तुझा ? म्हंगालों तुझ्या मनाची खात्री करून घ्येतों, आन् स्वामींना सगळं सांगून टाकतों म्हंगालों !

**गिरजा**—(वेडावून) म्हंगालों, म्हंगालों, काय म्हंगालों ?

**बिना०**—म्हंगालों इच्यारून घ्येतों आन् ......

**गिरजा**—काय घियाचं हाय इच्यारून स्वामींच्या पासनं ?

**बिना०**—अग, लगीन कवा व्हयल त्यं ? एकदां हुरकून घ्यातलेलं बरं !

**गिरजा**—काय बोललास पर आगदीं माज्या काळजांतला सबूद !

**बिना०**—व्हय ना ? मला वाटलंच व्हतं कीं, माजी गिरजा लगीन करण्यापाय सारकी माशावानी तडफडतीया म्हून !

**गिरजा**—हिराच तसा पडलास न्हा तूं ! आरं, सरदारी कमवायची सोडून लगीनाची घाई लागली हाय, व्हयरं तुला ? तुझ्यासारख्या भितऱ्या भागूबाईची बायकू व्हंन्या परास लगीन् न्हाई झालं तरी—

**बिना०**—म्हंजी ? तूं लगनाशिवाय ऱ्हानार हायस व्हय ?

**गिरजा**—व्हय ! व्हय ! लगनाशिवाय ऱ्हानार हाय ! मग तुजं काम म्हंननं हाय !

**बिना०**—आग, ग, ग, ग ! काय ह्यं डवॉस्कं फिरल्यावानी बरळतियास ! आग, लगीन करायची न्हाईंस, मग काय खंडूबाची मुरळी व्हन्याचा इच्यार हाय व्हय तुजा ?

**गिरजा**—व्हय ! व्हय ! मुरळी व्हन्याचा इच्यार हाय माजा मग ?

**बिना०**—आग पन, तूं मुरळी झाल्यावर डफ तुणंतुणंवाला त्यो, खंडुबाचा वाग्या, तुला डोळं मारील ना ? अग, हायस कुठं तूं ?

**गिरजा**—मेल्याचं डोळं खुरप्यानं भाईर काढीन, त्ये म्हाईत न्हाय! वाघ्या डोळं मारतुय!

**बिना०**--आग पर माज्यासारखा यवढा मोठा शिलदार असतांना, तुला मुरळी कशी होऊ दिन मी! मग सांग गिरजा, तुला हाय ना माजं म्हननं पसंत? बोल कीं? तूं गप्प बसलीस का? माझा जीव कसा खालीवर व्हतुय पग! मग हाय ना तुला कबूल?

**गिरजा**--हाये! हाये! हाये!

**बिना०**--अहाहा! काय पन ग्वॉड बोललीस गा!

राग मांड-कव्वाली

**अशी बोल जिवाला हंसवाया।**
**मी तुज्या जिवाचा राया ॥धृ०॥**
**तुझ्या माझ्या जिवाची फुलवेल।**
**पिरतीन कधींग फुलवशील।**
**तूं मैना अन मी राघू।**
**हास जिवा खुलवाया ॥१॥**

**गिरजा—बरं**! बरं, ठावी हाय मला तुजी माया. अगुदर गुहमंदी चल, तिकडं संताजीदादा आपली वाट पगत असत्याल.

**बिना०**--आग, मग न्हाई कोन म्हंगाला, पर आपलं लगीन ठरलं, म्हनून सांगू नग हं, त्यास्नी!

**गिरजा--बरं, बरं**. ठाव हाय मला. (जातात).

[पडदा पडतो]

**प्रवेश ४ था**

# समाप्त

# अंक १ पहिला

## प्रवेश ५ वा

[ **स्थळ:**...जिंजीचा किल्ला. महाल ]

[ **पात्रें**—राजाराम महाराज, हुजऱ्या, खंडुजी, तापसी मीरा.]

[ राजाराम पत्र वाचीत, विचारांत प्रवेश करतो, प्रथम शंकराच्या, नंतर शिवाजीमहाराजांच्या तसबीरीला नमस्कार करतात. ]

**राजाराम०**...मराठ्यांच्या माथीं, संकटांची परंपरा सारखी कोसळत आहे, यांत आमचं दुर्दैव समजावं, कीं अखिल महाराष्ट्राचे दादासाहेबांच्या वेळीं, कवि कुलेश कब्जीनं, दहा लाखांच्या खोट्या आशेनं, मराठ्यांच्या महाराजाला पकडून देऊन, त्यांचा घात करविला आणि अखिल महाराष्ट्राला धाई धाई रडायला लावलं ! आणि मिळवलं काय, तर शेवटीं फांसावर लटकला ! सूर्याजीनंहि तेंच केलं. प्रत्यक्ष मराठ्यांची गादी, विश्वासानं ज्याच्या स्वाधीन केली, त्यानंच तिची उलथापालथ करून, मराठ्यांच्या महाराणीला इतिकत-खानाच्या सुपूर्द केली. मिळवलं काय, तर मोगलांची गुलामी ! ती सुद्धां देशोधडीला लावण्याच्या कामीं आली. ( हुजऱ्या प्र. क. व मुजरा करतो. )

**जासूद०**—महाराज, बाहेर चिटणीस आलेले असून, मुलाखतीचीं आज्ञा मागत आहेत.

**राजा०**—जा त्यांना पाठवून दे. सूर्याजीप्रमाणंच गणोजी शिर्के प्रत्यक्ष आमचे मामा ! त्यांना शिरकाणाच्या सुडाची अवदसा सुचली आणि बादशाहाच्या मोजडीची ठोकर खातांचपश्चात्ताच्या दग्ध होमकुंडांत, तावून सुलाखून, पुनीत होऊन, पुनश्च मराठ्यांशीं दिलजमाई करून नेकीच्या गोष्टी करूं लागले.

**खंडूजी०**—( प्र. क. ) मग आतां कोण बेइमान होऊं पहात आहे ? [मुजरा करतो] असा कोणता मराठा आहे कीं, तो प्रत्यक्ष भारताशीं, या राजाराम-महाराजांविरुद्ध मराठ्यांच्या गादीविरुद्ध फितुरी करावयला तयार झाला ?

**राजा०**—या, या, खंडूजी, अगदीं योग्य वेळीं आपण आलांत, खंडूजी, प्रत्यक्ष फितुराला अलमगिराच्या चढावाच्या ठोकरींचा प्रसाद मिळत असतां, अझूनहि आमचे भाईबंद फितूर होऊन बादशहाच्यापुढें लाळघोटेपणा करतात, त्याला काय म्हणावं ! ज्या मोंगलांनीं हिंदूंचा हिंदुधर्म नेस्तानाबूत करण्याची प्रतिज्ञा केली, ज्यांनीं आमच्या देवांचीं देवळं मोडून, मूर्तींचीसुद्धां विटंबना केली, आमच्या आयाबहिणींना आईबहिण म्हणण्याचा अधिकार आम्हांला लाभूं देत नाहींत, आणि स्वकीयांच्या मानेवर, फितूरीचे सुरे फिरवितात, यापेक्षां दैवदुर्विलास कोणता ! या फितुरीच्या ठिणगीचा वणवा, कुठवर भडकेल कोण जाणें.

**खंडूजी०**—महाराज, असे निराश होऊं नका. नागोजीसारखे हजारों नाग, विषारी दंश करण्यास टपले असले तरी आबासाहेबांच्या पुण्याईनं, असल्या विषारी भूजंगांचीं डोकीं ठेंचायला, नेकीचे नेकजात कांहीं कमी नाहींत. संताजी–धनाजीसारखे रणझुंजार आणि विठूजी चव्हाणासारखे तडफेचे योद्धे, समरभूमीवर शत्रूच्या रक्ताचे सडे शिंपण्यास तयार असतां, निराशेची छाया, आपल्या मनावर कां उमठावी, बुद्धीला पटत नाहीं

**राजा०**—खंडूजी ! तुमच्या आमच्यासारखीं साऱ्यांचीं मनं पाक असतीं तर नेक इमानाची नेकी, तुफानदर्याच्या लाटेसारखी थयथयाट करून, शत्रुच्या काळजांत धडकी भरून, दुष्मन जागच्याजागीं थिजला असता पण नेकीं आणि इमान जिथं उरलं नाहीं ज्यांच्यावर भरंवसा ठेवून सुखें निद्रा ध्यावी, तेच जर गळा कापूं लागले, तर मनाला शाश्वति कशी वाटावी ? आजवरच्या इतिहासाचं सिंहावलोकन केलं तर जिकडे तिकडे फितुरांचा बाजारी बुजबुजाटच दिसतो, याला कारण ?

**खंडू०**—मराठ्यांच्या अंगचा काटकपणा जाऊन, मोंगली ख्यालीखुशालींची ऐषआरामी रंगेल वृत्ति आणि लांचलुचपतीची अभिलाषा अंगीं बाणली

आणि त्यातूनच फितुरीचा नंगा नाच सुरू झाला, पण या सर्वाला जबाबदार कोण?

**राजा०**—याला जबाबदार, स्वार्थी लोलुपतेनं आपल्याच घरावर अंगार फेकणारीं, सूर्याजी पिसाळासारखीं स्वार्थाला चटावलेलीं पिसाट कुत्रीं ! आणि तीं बिनदिक्कत तयार झालीं नसती तर-अरेरे ! आमच्यातील या दुष्टांमुळं, महाराष्ट्रावर, या स्वराज्यवृक्षावर, एका मागून एक केवढीं भयंकर संकटं गुदरलीं ! निमकहराम मराठ्यांना हाताशीं धरून, आलमगिरानं, मराठगादीवर अनेक तडाखे देऊन मराठ्यांचं सिंहासन मुळासकट उखडण्याचे शिकस्तीचे प्रयत्न केले. अलमदुनियेला चांदताऱ्याच्या हिरव्या निशाणाखालीं झुकवून, इस्लामाचा आदेश देण्याची, एकधर्मी राज्यकरण्याची मनीं मनीषा बाळगून, अखिल महाराष्ट्र, मोंगली साम्राज्यास जोडण्यासा चंग बांधून औरंजेब दक्षिणेंत आला.

**खंडू०**—पण आलमगिरानं दक्षिणेंत पाऊल टाकतांच, मराठ्यांच्या मर्दुमकीनं त्याचं काळीज जागच्या जागीं थिजलं. लाखों सैनिकांच्या गराड्यांतून, प्रत्यक्ष औरंगजेबाच्या किनखाबी तलम तंबूच्या शिखरावरील सोन्याचे कळस, सिंहाच्या झडपेनं, मर्द संताजीवीरानं छाटून आणून, आपल्या पायाशीं सादर केले, आणि मराठदौलतीचं शिखर सोनेरी केलं! धनाजीच्या एकेरी नांवानं, शत्रुचं मुकं जनावर पाणी पिईनासं झालं ! रणमैदानांत शत्रुच्या काळजांत धडकी भरून, त्यांच्या हातांतील शस्त्रं आपोआप गळून पडूं लागलीं ! निधड्या छातीच्या मराठमर्दांनीं शत्रूला पळतां भुई थोडी केली; असं असतां आपण निराश कां व्हावं ?

**राजा०**—निराशेची अंधुक छाया आमच्या मनावर उगीच नाहीं उमटली खंडूजी ! मनाला बेचैन करणारी आणि बुद्धीला न पटणारी, बिजलीच्या वाटेनं क्षणांत चमकून एक अंधुकशी, छाया आमच्या मनाला चाटून गेली. मनाला न पटणारी ही बात, खरी ठरली तर......

**खंडू०**—अशी ही महाराजांच्या मनाला बोंचणारी, बेदिल करणारी कोणती गोष्ट, ती या खंडूजीला समजेल तर बरं होईल.

**राजा०**—आमच्या काळजाला चटका लावणारी गोष्ट म्हणजे, धनाजीराव जाधवांच्या जासुदानं आणलेली ताजी बातमी ! सेनापति संताजीराव घोरपडे शत्रुला सामील झाल्याची निखालस ग्वाहि !

**खंडू०**—काय......काय म्हणतां आहांत महाराज ?

**राजा०**—आमच्या मनावर शंकेची सावली उमठविणारा, हाच तो लखोटा ! ( खंडूजी लखोटा घेऊन वाचतो. )

**खंडू०**—हा लखोटा निखालस धादांत खोटा आहे. याच्यावर संताजीरावांची स्वाक्षरी नसून कुणा कर्म चांडाळानं ती त्यांचीच वाटावी म्हणून बनावट... अगदीं खोटी......खोटी केलेली आहे. मी मराठ्यांचा चिटणीस जातिवंत मराठ्याची सही ओळखत नाहीं, असं कां वाटतं आपल्याला ?

**राजा०**—मग हें कुणा धर्मघातक्याचं काम असावं, असं आपल्याला वाटतं खंडूजी ?

**खंडू०**—तर्क बुद्धीला न उमजण्याइतकं अजब कोडं, कपटनिपुणतेंत परांगत असलेल्या आलमगिराशिवाय, असला हा दुहीचा फांसा टाकण्यांत वाकबगार आज मला तरी कुणी दिसत नाहीं. आणि हे कारस्थान शिजविण्यासाठीं, तुकड्याच्या आशेनं दिल्लीच्या तख्ताजवळ लाळघोटेपणा, करणारं, एकादं पिसाट कुत्रं दातांशीं धरलं असल्यास नवल नाहीं.

**राजा०**—खंडूजी, आपला तर्क कदाचित् खराहि असेल, पण आमच्या पोळलेल्या मनाला आणि सरळ बुद्धीला पटत नाहीं. खंडूजी, आतांच्या आतां सांडणी स्वारा करवी पंतांना कळवून, संताजीरावांकडून सेनापतिपदाची वस्त्रं काढून घेतल्याचं कळवा. जा. ठरल्या मनसुब्याला विलंब नको.

**खंडू०**—महाराज......महाराज, आपण......चाकरानं बोलूं नये...पण बोलावं लागतं, त्याला नाइलाज आहे. संताजीराव घोरपडे, पुराव्याच्या अभावी

**राजा०**—खंडूजी ! निखालस बातमी मौजुद असतां, पुराव्याची तर्कटं लढवण्यांत काय अर्थ ?

**खंडू०**—तर्क वितर्काचं मंथन करून, आबासाहेबांनीं मराठ-दौलतीच्या उसळत्या सागरांत मिळविलेलीं अमुल्य रत्नं, उगाच पायदळीं तुडविलीं जाऊं नयेत म्हणून चाकराच्या शब्दवाणीचं पाऊल अमर्याद पुढं पडत आहे, याची

माफी असावी. पण.....तोंडा पेटल्यावर बंदूकीची गोळी परत येणं कधीं शक्य तरी आहे काय ?

**राजा०**—शक्यशक्यतेची वावटळ आमच्या मेंदूंत सारखी धिंगाणा घालीत आहे; अशावेळीं ठरलेला मनसूबाच योग्य वाटतो......जा.

**खंडू०**—आज्ञा महाराज ! ( मुजरा करून निघून जातो. )

**हुजऱ्या**—( प्र. क. ) महाराज ! बाहेर तापशी माता...

**राजा०**—येऊ दे आंत.

**ता० मीरा०—समर्थाचिया सेविका वक्र पाहे । असा सर्व भू मंडळी कोण आहे । जयाची लिला वर्णिती लोक तीन्ही । नुपेक्षीं कदा रामदासाभिमानी ॥**

**राजा०**—माता-तापसी मीरा ? माते ! या बालकाचा तुला प्रणाम असो ! माते ! माझ्यासारख्या मूढमति राजाला, संकटाच्या परंपरेनं पडलेलं गूढ उकलून सांगण्यासाठींच तर परमेश्वरानं नाहीं ना तुला इथं धाडून दिली ?

**ता० मीरा**—राजा, तुझ्यावरील संकटांची परंपरा अशी विलक्षण आहे, तिथं कुणी कितीहि प्रयत्न केले, तरी त्याला त्यांत यश मिळणं शक्य नाही.

**राजा०**—माते ! अगोदरच आमच्या पोळलेल्या मनाला, तुझ्या या निराशाजनक भाषेनं कां दग्ध करीत आहेस ? रायगड राजधानी खालीं होऊन, इथं जिजींत आज सात वर्षं बादशाहाच्या मगरमिठींत सांपडलों असतांही यशाविषयीं तिळमात्रहि शंका प्रगट न करतां, वेळोवेळीं उत्तेजन देणारी ही तापसी माता आजच असे करुण सूर कां आळवूं लागली ! असं कोणतं मोठं संकट या राजारामावर गुदरणार आहे कीं, आपल्यासारख्या तापसीनं, प्रत्यक्ष भवानी मातेनं आमच्या यशाविषयीं साशंक व्हावं ?

**ता. मीरा**—बेटा ! आणखी कोणतं मोठं संकट आहे, कीं तें सेनापती पानसंबळांच्या मृत्यूपेक्षां आधिक असेल ?

**राजा**—देवी ! काय म्हणालीस ! तापसी माते, काय म्हणालीस !

**ता. मीरा**--बेटा, या मराठ्यांच्या गादीचा एकनिष्ठ सेवक, सेनापति पानसंबळ रुद्रगड लढवित असतां, जखमी होऊन, शरपंजरी पडलेला मराठ्यांचा भीष्म महाराष्ट्राला सोडून गेला......

**राजा०**--हाय रे दुर्दैवा ! अरेरे ! सेनापति पानसंबळ ! बा महाराष्ट्रा ! विधात्यानं तुझ्या ललाटीं असा काय शेरा मारला आहे, म्हणून एकामागून एक महाराष्ट्राचे मोहरे असे काळाच्या दाढेंत चिरडले जात आहेत !

**ता० मीरा**—बेटा शांत हो ! शोक आवर. तुझ्यासारखा सत्त्वशील राजा जोंवर महाराष्ट्राला लाभला आहे. तोंवर सेनापति पानसंबळ सारखे कित्येक सेनापति तयार होतील, याची खात्री असूं दे. बेटा आम्हीं येतों आतां. ( राजाराम म० पाया पडतात; ती आशेर्वाद देते. )

**ता० मीरा**—सदा विजयी हो ! राजा, सदा विजयी हो !

[ राग देसकार त्रिताल ]

**प्रभुची कृपा महाराष्ट्र देशा । भूपा अमुपा ॥ धृ० ॥**
**तव स्वार्थत्यागा तुलना जगींना ।**
**उजळी देशा नव तेज दीपा ॥**

[ पडदा पडतो ]

## पहिला अंक समाप्त

# अंक २ रा

## प्रवेश १ ला

**स्थळ:**--चंद्रगडावरील बुरूज

**पात्रें:**—चंद्रा, खान, विठूजी, सूर्याजी, हेर, शिपाई

[**लढाई**--शिपाई लढतात, चंद्रा उत्तेजन देत आहे. 'मारा' 'हाणा' 'दीन' 'दीन' अशा आरोळ्या. शिपाई मरतात; खानाचे शिपाई गडाच्या दरवाजानं आंत जाणार, तोंच चंद्रा हातांत तलवार घेऊन समोर उभी रहाते.]

**शिपाई**—ताईसाहेब घात झाला !खानानं किल्ल्याचा दक्षिण तट उडवला सारा यवन किल्ल्यांत घुसला, घात झाला ! घात झाला ताईसाहेब घात झाला.

**चंद्रा**--जा ! किल्लेदारानां सांगा, तुम्हीं शत्रूला दक्षिण दरवाजांत थोपवून धरा, मी हा बुरूज सांभाळते. आणि माणकोजी जाधवाना म्हणावं, माझ्या मदतीला या. जा, जा लवकर ! ( आंत आवाज ) झालं ! आतां गड कसा टिकाव धरणार ? आई जगदंबे ! आतां तुलाच आमची काळजी. ( आंत गर्जना. ) शाबास ! हाणा मारा ! हा आला लोंढा ! (तलवार उपसून मुसलमान येतात, लढतात, पडतात. मागून करीम खान प्र. क. )

**करीम०**—ठहेरो ! औरतों पर हत्यार चलाना नामर्दका काम है ! मर्दकी कलई मर्दके साथ भिडेगी ! बोल ! बोल, मुली तूं कोण आहेस ?

**चंद्रा०**—एक मराठ्याची मुलगी ! खानसाहेब, चला तयार व्हा आणि करा माझ्याशीं दोन हात !

**करीम०**—शाब्बास ! शोभतेस तूं मराठ्याची मुलगी ! मुली, कुणाची मुलगी तूं ? कुणा भाग्यवान पुरुषानं, तुझ्या पित्याचा मान पटकावला आहे ?

**चंद्रा**०—मी सेनापति महादजी पानसंबाळांची मुलगी चंद्रा ! मराठ्यांच्या गडांची रखवालदारीण !

**करीम**०—क्या ! मरहटोंके सेनापतीकी लडकी चंद्रा ! या अल्ला ! धन्य तेरी !......येह कैसी बिजली तुन्हे पैदा की है ? बेटी, माझा नाइलाज आहे तुझ्यासारख्या रणचंडिकेला पेशकब्ज केल्याविना मला गत्यंतरच नाहीं. बेटी, तलवार म्यान कर, तुझ्यासारख्या कोवळया मुलीनं गड लढवणं काम सोपं नाहीं !

**चंद्रा**०--तें लवकरच दिसेल खानसाहेबांना !

**करीम**—पोरी ! बऱ्या बोलानं समशेर खालीं टाक. शिपाई हो ! देखते हो क्या ? निकालो वो जरीपटका, और उस जगह अपना चांदतारा लगाइए !

**चंद्रा**--निशाणाला हात लावण्या अगोदर, मुडदे पडतील कैकांचे ! खानसाहेब ! माझा मुडदा पाडल्या शिवाय, कुणालाही पाऊल पुढं टाकण्याची खुमखुमी असेल, त्यानं अल्लाचं नांव घेऊनच पाऊल पुढं टाकाव जोवर माझ्या जिवांत जीव असेल तोंवर मराठ्यांचा भगवा झेंडा त्या कोहिनूर बुरुजावर असाच अंतराळांत दिमाखानं फडकत राहणार !

**करीम**०—किल्ला हस्तगत करण्यासाठीं रक्ताचें कारंजें ज्यानं उडवलें त्या मला, तुझ्यासारख्या कोवळया पोरीच्या डुरकावण्याची डर वाटेल, असें तुला वाटतं ?

**चंद्रा**०—नाहीं, ज्या मराठ्याच्या पोरीनं मोंगलांच्या हजारों सैनिकांनीं गडाच्या चिंधड्या केल्या असतां, मराठ्यांची कत्तल झालेली पाहत असतांसुद्धां, पूर्वजांचं स्मरण करून, या वेळपर्यंत टिकाव धरला, तीच चंद्रा, एका खानाला भिऊन दरवाजा मोकळा करून देईन. अशी भलती आशा खानसाहेबांना तरी कां वाटावी ?

**करीम**०—पोरी ! कुणासमोर बोलते आहेस तूं ?

**चंद्रा**०—महाराष्ट्राचा दुष्मन न ओळखण्याइतकी, ही चंद्रा अज्ञान नाहीं खानसाहेब, आपल्या बेताल बाताफेकींत, ही मराठ्यांची कोवळी पोर कदाचित्

हार जाईल, पण तलवारीच्या सलामींत आपल्याला कधींच हार जाणार नाहीं, हें पक्कें समजून असा !

**करीम०**—मराठ्यांच्या बहाद्दर मुली ! तुझ्या शौर्याबद्दल मला, या खानाला तिळभरहि शंका नाहीं, तसंच तुझ्या निधड्या शब्दचातुर्यापुढं या खानाचं शीर आपोआप नम्र होईल. लेकीन् बेटा, माझा ना इलाज आहे. किल्ला सर करून आमचं हिरवं निशाण न लावतां, किल्ला सर केला, असं कसं म्हणतां येईल ? बेटा, मी हुकमाचा बंदा ! मला माझ्या ब्रीदाला जागलं पाहिजे, म्हणून म्हणतों, बाजूला हो.

**चंद्रा०**—खानसाहेब, तुम्हाला तुमच्या ब्रीदाला जागलं पाहिजे, आणि आम्ही मराठ्यांनीं आमचं ब्रीद गहाण टाकलं आहे, असं का तुम्हाला वाटतं? खानसाहेब, माझ्या जिवाची आहुति देईन, पण निशाणाला हात लावूं देणार नाहीं हीच माझी प्रतिज्ञा !!

**करीम०**—बेटी, मराठ्यांच्या मर्द संताजीनं, आमच्या छावणीवर छापा घातला असतां सारे मोंगली कबिले हातीं आले, पण स्त्रियांवर हत्यार न चालवतां, त्यांच्याजवळ असलेली चिजवस्त न लुटतां, त्यानं त्यांना बहुमानानं आमच्या सुपूर्द केलं. त्या घडीपासून, शत्रूच्या स्त्रियांवर हत्यार चालवणार नाहीं, त्यांचा मान राखीन, अशी मी प्रतिज्ञा केली आहे. आणि आतां तूं निर्वाणीची प्रतिज्ञा करून, या बुढ्या खानाच्या हातांत बागड्या भरल्यास ! बेटा......

**चंद्रा०**—खानसाहेब, मला बेटी म्हणून माझ्या कैलासवासी वडिलांचा मान आपण पटकावलांत, आणि कोळशाच्या खाणींत असले हिरे चमकतात, हें स्वकृतीनं पटवून दिलंत ! ( 'हर हर महादेव' अशी गर्जना होते. )

**करीम०**—( आपल्या लोकांना उद्देशून ) क्या गलबला है ? देखो क्या हुआ ? ( एक शिपाई घाईघाईनं येऊन )—

**शिपाई०**—हुजूर जान बचाइए ! मरहट्टोंका चौफेर हल्ला हुआ ! न मालूम सैतान कहांसे निकले ?

**चंद्रा०**—माता भवानीची जय !

**करीम०**—बेटी, तुझी माझी प्रतिज्ञा सलामत रहावी, म्हणून तर अल्लानं ही पर्वणी पाठविली नाहीं ना ? नाहींतर अचानक हे मरगठ्ठे कुठून आले असते ?

**चंद्रा०**—खानसाहेब, तुमचा अल्ला आणि आमचा भगवान हे एकच ना ? त्याला मनापासून मारलेली हांक, नेहमींच ऐकूं जात असते. ( आंत आवाज-'दीन दीन ' हर हर महादेव, भवानी मातेची जय ! )

**करीम०**—या अल्ला ! मारो ! काटो ! दौडो ! वारे मर्द ! वारे बहाद्दर ! ( जातो ).

**चंद्रा०**—वारे मराठा ! वारे मराठा शिलेदार ! वारे मर्द ! शाबास ! बोला, भवानी मातेची जय ! विठूजी ! पाठीमागं......शाबास ! हा आला दुसरा, शाबास ! ( सर्वांग रक्तानं माखलेला विठूजी प्र. क. )

**विठू०**—मारा ! हाणा ! बोला हरहर महादेव !

**करीम०**—दीन !-दीन !-दीन ! ( करीमखान दोघे लढतात ).

( सूर्याजी व त्याचे साथीदार मागून येऊन चंद्राला पकडून नेतात, ती ओरडते. )

**चंद्रा०**—दगा ! दगा ! मेल्या मांगा तूं ? निमक हराम !

**सूर्या०**—अरे पहातोस काय ? कोंब बोळा तिच्या तोंडांत ! (घेऊन जातो.)

**एक शिपाई०**—( विठूजीला उद्देशून ) सरदारसाहेब, चंद्राताई कुठं दिसत नाहींत !

**विठू०**—पहा तिकडे बाजूला. ( सर्व मराठे लढतात; विठूजी खानाला बुरुजाच्या तटाकडे रेटीत नेतो. खान जातो. ) शाबास ! वारे बहाद्दर ! शरण आलेल्यांना मारूं नका. चंद्रा, चंद्रा कुठं आहे माणकोजी ?

[ पडदा पडतो ]

**प्रवेश १ ला**

## समाप्त

**विठू०**—( प्र. क. ) वा रे बहाद्दर ! वा रे मर्दगडी ! वा रे भागुबाई ! लेका ! मघां मोठा शूराचा आव आणीत होतास ! काय हातवारे करून धांगड-धिंगा घालीत होतास ! आणि हें अंगावर रे काय ? एकाद्या चित्त्याची शिकार केल्यागत, कींवा, लढाईवरून मर्दुमकी गाजवून आलेल्या मर्दाप्रमाणं, आंगरख्या-वर, हे रक्ताचे डाग आहेत कीं कुंकवाचे ?

**बिना०**—कु–कुठं रं ?

**विठू०**—हात् लेका ! मर्द मराठ्याची अवलाद सांगतोस, आणि क–क–आणि प–प–प करून, असा बायकोच्या मागं लपतोस काय ? हात् भागुबाई !

**बिना०**—काय रं ए मराठ्याच्या मुर्ग्या ! कुणाला रं भागुबाई म्हंगतोस ? अर ऽ, मघां ह्यो पट्ट्या भ्याला, असं तुला वाटलं व्हय रं ? अर मर्दा, त्यो एक पट्ट्याचा हात दाखीवला या माझ्या सजनीला ! अर, गनिम कसं भ्यात्यात, त्यें दाखीवलं हिला, आयच्यान गा ! पाहिजे तर मी हिची शपथ घेतों.

**विठू०**—तुझं थोबाडच सांगतंय तें ! मर्दच तसा ना तूं !

**बिना०**—अर ए ! त्वांड झाकलेल्या बाप्या तूं कोन हायस रं ? अगदीं इटूजी चव्हाणाचा आव आणत्योस त्यो ! अन् ह्या असल्या रानांतून कशापायी हिंडतुयास रं ?

**विठू०**—मला विचारणारा तूं रे कोण ?

**बिना०**—(स्वगत) इचिभन ! ह्यो तर मलाच इचारतोय कीं, तूं कोन म्हून ! ( उघड ) अर ए, तुला ठाऊक नाय मी कोन हाय त्यो ? अर ह्यो पठ्या हिंमतबहाद्दर इटूजी चव्हाण हाय चव्हाण ! मला वळखीत न्हाईस म्हंजी काय ? ( विठूजी घाबरल्याचं सोंग करतो. ) आतां लेकाचा कसा कापायला लागला ? मला भ्यॉवतुइस व्हय रं ? अग ए गिरजा, पघ पघ या पठ्याची करामत ! ह, ह, ह, ह, !

**गिर०**—दिवे ओवाळूं कां ? ( विठूजीकडं )अवो ऽ कशापायी भ्यातायसा ह्येला !

**विठू०**--न्हाई म्हटलं हे हिंमतबहाद्दर......

**बिना०**—अर व्हय ! ह्यो पठ्ठया हिंमतबहाद्दर इठुजी चव्हाण, संताजी-रावांच्या पथकामंधी असतो, त्योच मी !

**विठू०**—जी सरकार ! ( तोंडावरील पडदा काढतो. )

**बिना०**—अरच्या ! अरऽह्यो तर त्योच ! काय लेकाचा सोंगाड्या ! सोंग काढून लोकांना भ्यावतोय ! अरऽपर, असा पघतुयस काय माझ्याकडं ? म्हंगालों म्या पर शिलदार हाय !

**विठू०**—अस्सं !

**बिना०**—इच्यार हवं तर हिला. अर ह्यो जवान तुझ्या अदुगर सरदार व्हतुया पघ ! अर हायस कुठं तूं ? हँः हँः हँः हँ; ! लेका सोंग काढून कुठं सरदारकी मिळती व्हय रं ?

**गिरजा०**—अ हा ऽ हा ! सरदार व्हनाराचं त्वांड पघा ! अवो, म्यां म्हंगाते, तुमी सरदार व्हत्याल, तवा तुमची शिपुड्यांची पगडी माझ्या इठूजी-दादाला द्या बरं ?

**बिना०**—( स्वगत ) कसं थोबाड हालतंय भांडकुदळीसारखं ! (उघड) अग ए ! माझी थट्टा करतीस व्हय ग ? म्हंजी मला गुंगारा देऊन, तूं आयतीच त्येच्या पदरांत पडाया मागतीस जनूं ! मी ह्यो जिवाचं रान करून, असा रानावनांत भटकतोय, त्यो ह्या बोकडाला तुला द्यायाला व्हय ग ? हें बघ इठूजी, तूं आतां गुमान जा कसा इथून ! न्हाईतर बायकोपायी तुझ्यासारखा मैतर तुटल मला !

**विठू०**—वा रे शिकंदरचा बाप ! अरे मूर्खा ! तुझ्या जिभेला हाड आहे कीं काय ?

**गिरजा०**—म्यां पर त्येंच म्हंगतेय, कीं तुझं ह्यें त्वाँड हाये कीं तोबरा ?

**बिना०**—अग घ्वोड्याचा तोबरा असतां, तर अगुदर ह्येला चन्यासारखा रगडला असता, पन ह्यो तोबरा बी न्हाई अन् घोड्याचं त्वाँड बी न्हाई !

**विठू०**—तोंड असतं, तर गाढवासारखा ओरडला असतास, आणि दुसरं काय असतं, तर दुगाण्या झाडल्या असत्यास !

**बिना०**—म्हंजी तुं समजतुस तरी काय ह्या पठ्याला ?

**गिरजा०**—तुला घ्वॉडा म्हंगाला, अन् दुसरं काय ?

**बिना०**—अग पर, म्या घ्वॉडा झाल्यावर, तुला काय म्हंगायचं ग ?

**गिरजा०**—म्हंजी मला घ्वाडी म्हनतुयास व्हय रं ? ( मारायला जाते तो पळतो. )

**विठू०**—बिनाजी अरे, बिनाजी इकडे ये पाहूं आगोदर !

**बिना०**—( परत येतो ) काय रं, आजून माजी फजिती करायची हाय व्हय रं ?

**विठू०**—कसंही करून चंद्राला अगोदर शोधून काढली पाहिजे !

**बिना०**—आरं काय ? म्हंनतुयास तरी काय चंद्राक्का ?

**विठू०**—होय तीच ! चंद्रगडाच्या लढाईत अच्यानक तिला कुणीतरी पळवून नेली ! वाटेल तें करून तिला आधीं शोधायला हवी.

**बिना०**—चल तर ! पर गिरजाला सांगू का रं ?

**विठू०**—हो, पण चल अगोदर. ( जातात ) [पडदा पडतो ]

**प्रवेश २ रा**

**समाप्त**

# अंक २ रा



## प्रवेश ३ रा



**स्थळः**—विशाळगड–महाल.

**पात्रेंः**—[ हुकमतपन्हा रामचंद्रपंत, हुजऱ्या, संताजी. ]

**राम० पं०ः**—नाहीं......नाहीं, बुद्धीला पटत नाहीं. ज्या वीरानं रात्रंदिवस जिवाची तमा न बाळगतां, स्वराज्यवृक्षाला जलसिंचन करून वाढीस लावला, तोच आज मोंगलांना सामील होईल, असं म्हणायला या पंत अमात्याचं हृदय

तरी ग्वाही देत नाहीं, पण राजाराम महाराजांचा हुकूम !......अरेरे ! महाराष्ट्रा, काय तुझ्यावर हा दुर्दम्य प्रसंग हा !

**शिपाः**—सरकार, बाहेर सेनापती संताजीराव घोरपडे आले आहेत.

**रा॰ पंतः**—जा त्यांना आंत पाठवून दे. ( संताजी प्रवेश करून मुजरा करतो. )–या संताजीराव—

**संता॰**—संताजीराव ! ज्या वीराला, प्रत्यक्ष महाराज सुद्धां सेनापती संताजीराव याच नावानं संबोधीत असतां, आज पंतांनीं सेनापतीचा उपमर्द करण्याच धाडस कां करावं ?

**रा॰ पंत**—संताजीराव माफी असावी, तुम्हीं आजपर्यंत ज्या स्वराज्य-वृक्षाला अविश्रांत जलसिंचन करून, नवी पालवी फोडलीत, तुमच्याच तपश्चर्येनं स्वराज्यवृक्ष नव्या जोमान फोफावला, त्याच वृक्षाच्या मुळावर घाव घालण्याइतकी उलट्या करणीची बेइमान बुद्धी आपल्याला कां आठवली?

**संता॰**--पंत ! काय बोलतां आहांत हें आपण ?

**रा. पंत॰**—ठीक बोलतों आहोंत ! तुमच्या इमानाविषयीं आम्हीं साशंक आहोंत.

**संता॰**--या नेकीच्या नेकदारानं, आपलं इमान शाबूत राखलं आहे. इमान आणि बेइमान हें कळण्याइतकी अक्कल दिली आहे देवानं या संताजीला.

**रा. पंत॰**--अस्सं ! एकूण आपण नेक इमानाला जागलां आहांत तर !

**संता॰**—अलबत् ! या देहांत रक्ताचा एक बिंदू असेतोंपर्यंत, मराठगादीची सेवा इमानें इतबारें करीन, अशी या संताजीची प्रतिज्ञाच आहे.

**रा. पंत॰**—इमान इतबाराची प्रतिज्ञा करून, नेक इमानाची तरफेन करणारे आपण, मराठ्यांचे सेनासागर, कपटी अलमगिराच्या मनसुब्यांत सामील होऊन, मराठगादी उलथून पाडण्याचा नामानिराळा डाव खेळत आहांत, तें कां, बोला !

**संता०**—हरहर ! पंत, काय ऐकतों आहे मी हें ! असलं नीच कृत्य माझ्या कमावल्या कीर्तीला काळीमा फांसणारं निंद्य कर्म, हा संताजी, जिवांत जीव असेतोंपर्यंत कधींच करणार नाहीं.

**रा. पंत०**—तुमच्या शब्दांत प्रतिज्ञा करणारे गणोजी शिर्के, सूर्याजी पिसाळ, यांची कारकीर्द आठवली कीं, मन साशंक होऊन, आपण अपराधी असल्याची सत्यता पटवून घ्यावी लागते.

**संता०**—पण याला पुरावा ?

**रा. पंत०**—संताजीराव, आपल्या विरुद्ध सबळ पुरावे नसले तरी जे आमच्या हातीं लागले आहेत त्यांच्या आधारें, आपण मराठगादीशीं फितूर आहांत अशी शंका येऊन, हृदयाला खात्री वाटते, आणि महाराजानांहि तें पटलं आहे. त्यांच्या हुकमावरून आपलीं सेनापतिपदाचीं वस्त्रं—

**संता०**—पंत ! काय ऐकतों आहे मी ! तारुण्यांतील भरमसाट सारी शक्ती, स्वातंत्र्याच्या हिंदवी स्वराज्याच्या कार्यासाठीं अर्पण केली. जिवाची तमा न बाळगतां, दिल्लीच्या तख्ताचे चुनेबंदी चिरे खिळखिळे केले, शत्रूला दे माय धरणी ठाय करून सोडलं, तें मराठी राज्याचं सेनापतिपद मिळविण्याच्या अभिलाषेन केलं, असं का वाटतं आपल्याला ?

**रा. पंत०**—( स्वगत )नाहीं ! खास नाहीं !

**संता०**—सेनापतीच्या जरी कलाबुतीच्या वस्त्रापेक्षां, माझीं शिलेदारी पेशाचीच वस्त्रं मला अधिक मोलाची वाटतात.

**रा. पंत०**—राजकारणांत राज्यकर्त्यांना उलटेसुलटे डाव खेळावे लागतात; त्यांत नजरचुकीनं एखादा फांसा चुकला, तर समजुतीचा घोंटाळा व्हायचा संभव असतो, पण महाराज जाणूनबुजून असली चूक करणार नाहींत, आणि ते इकडे आल्यावर, त्यांना ही खरी गोष्ट आपण पटवून देऊं.

**संता०**—पंत, तुम्ही माझी कितीहि समजूत केलीत, तरी ही म्यान केलेली माझी तलवार आतां म्यानाबाहेर पडणं अशक्य आहे. राजकारणाचे डाव खेळतांना रक्ताची रंगपंचमी उधळायचीच, पण भावंडांचे जीव घेण्यांत, तें राजकारण डाव खेळत असेल, तर त्या तसल्या राजकारणाला धिक्कार असो ! सर्रास बेकदर-

पणें माणुसकीला लाथेखालीं तुडवून, फितुरीचा काळा डाग, मायभूमीच्या मर्द मराठवीराला जिवंत मरणाइतकाच अपमानास्पद वाटतो.

**रा० पंत**—तुमच्यावर निव्वळ कुभांड रचून, विनाकारण तुमचा घात करावा, असं धनाजीराव-जाधवांना कां वाटावं? ते तर तुम्हाला सख्या बंधूप्रमाणं लेखतात.

**संता०**—सख्या भावा-बापाला, न् जातभाईला फांसावर लटकावून, आपली पोळी भाजून घ्यायची घरबुडवी बुद्धि आमच्या लोकांच्या मनावर बिंबली नसती, तर माझ्यासारख्या नेक शिपायांच्या माथीं, असा फितुरीचा शिक्कामोर्तब कां मारला गेला असता?

**रा० पंत**—आमच्या अन् महाराष्ट्राच्या दुर्दैवानं विचित्र घटना घडून नेकीच्या नेकदाराला फितुरीचा काळा डाग लागला खरा! अरेरे! महाराजांचा हुकूम! सेनापतीपदाचीं वस्त्रं......

**संता०**—पंत, सेनापतीपदाचीं वस्त्रं माझ्याकडून काढून घेतल्याबद्दल माझ्या मनाला बिलकूल विषाद वाटत नाहीं, पण महाराजांनीं केलेला हा फितुरीचा आरोप मनाला चैन पडूं देत नाहीं, पंत तुम्हींच सांगा, ज्यानं केवळ मातृभूमी-चीच, स्वराष्ट्राचीच सेवा करण्याचं व्रत म्हणून प्रतिज्ञा केली, त्या स्वराज्याच्या निस्सीम नेकजात सेवकाला हें सहन होईल काय?

**रा० पंत**—संताजीराव शांत व्हा! आपण स्वराज्याचे सेवक आहोंत. पुण्यश्लोक आबासाहेबांनीं वाढविलेल्या, या स्वराज्यवृक्षाच रक्षण करणं हेंच आपलं कर्तव्य आहे, कर्तव्य आणि ध्येय यांची सांगड घालून, आपल्याला पैलतीर गांठलं पाहिजे.

**संता०**—केवळ स्वराज्याची सेवा व्हावी, अखिल भारताचा, मराठ्यांचा हिंदवी भगवा झेंडा, अखिल जगताला दिमाखानं फडकतांना दिसावा म्हणून जिवाचं रान केलं, सुखशय्येचा त्याग केला, 'गोब्राह्मण प्रतिपालन' हा थोरल्या महाराजांचा महामंत्र अहोरात्र पठण करीत आलों, त्याचा मोबदला म्हणून, मी हा असा फितूर म्हणून आपल्यासमोर उभा राहिलों आहें! छे! छे! हें असलं जिणं जगण्यापेक्षां......

**रा० पंत**—संताजीराव घणाचे घाव घालून, हिरे पारखण्याची संवयच झाली आहे जणुं आम्हांला ! आणि म्हणूनच तुमच्यासारख्या एकनिष्ठ मराठमर्दांची कसोटी पहाण्याचं हें आम्हीं धाडस केलं, याबद्दल आपण आम्हाला क्षमा करालच; पण आमच्या ठिकाणीं जर आपण स्वतः असतां, तर तुम्ही सुद्धां मुत्सद्देगिरीचे असेच उलटे फांसे टाकले असतेत कीं नाहीं बोला ?

**संता०**—पंत ! आपल्यासारख्या मुत्सद्यापुढं, माझ्यासारख्या शिपायाचा कसा निभाव लागावा ? माझ्यासारख्या शिपाईगड्याला जर राजकारणाचे डाव कळले असते, तर हा प्रसंग खास गुदरला नसता पंत ! आम्हीं शिपाईगडी शर्थीची तलवार मारून, हुकमाची तामिली करणारे, आम्हांला राजकारणाचे गुंतलेले धागे सोडविण्याचं कसब कसं असणार ? काय हुकूम असेल तो सांगा म्हणजे मी तो बजावण्यांत माझं कर्तव्य समजेन.

**रा. पंत**—झाल्यागोष्टी इतक्या अकल्पित रितीनं घडल्या आहेत कीं, त्यांत मला कांहींच मार्ग सुचत नाहीं याबद्दल मला खेद वाटतो संताजीराव !

**संता०**—स्वराज्याच्या झुंजेसाठीं रायगडाहून घोडा फेकला तेव्हां राणी येसूबाईनीं 'चिरंजीव भव' असा शुभाशिर्वाद दिला, तो त्यांनीं दिलेला आशिर्वाद, त्यांना शत्रूच्या कैदेंतून सोडविण्याच्या आंत निष्फळ झाला, याबद्दल फार खेद वाटतो या स्वराज्यसेवकाला !

**रा० पंत**—थोरांनीं दिलेले आशिर्वाद नेहमींच खरे होतात संताजीराव ! मीहि असंच म्हणतों, आपण खरोखरच जगतांत चिरंजीव व्हाल !

**संता०**—( कपडे उतरून देतो. ) येतो मी आतां, संपली माझी कामगिरी ! ( जातो. )

**रा० पंत**—राजाराम महाराज ! संताजीराव इथून गेले, पण हा मराठ-गादीला अपशकून तर नाहीं ना ठरणार ? बा भारता ! काय तुझ्या ललाटीं लिहिलं गेलं आहे, तें तो जगन्नियंताच जाणें ! [ पडदा पडतो. ]

**प्रवेश ३ रा**

**समाप्त**

# अंक २ रा

## प्रवेश ४ था

**स्थळ**:—जंगल-रस्ता.

**पात्रें**:—विठूजी, बिनाजी, संताजी.

( विठूजी चिंताक्रांत प्रवेश करतो. )

**विठू०**--( स्वगत ) संताजीरावांना झोपेंत जरी विचारलं, तरी ते असंच उत्तर देतील. कीं मी आजवर जी स्वराज्याची सेवा केली, ती कोणत्याही मोबदल्यासाठीं, अथवा मानमरातब मिळविण्यासाठीं नसून, मोंगली गिधाडांच्या पंजांत सांपडलेले आपले हिंदु बांधव, त्यांच्या गुलामगिरींतून मुक्त व्हावेत, आपल्या आई-भगिनींना. मर्द मराठ्यांच्या वीरांगना म्हणून मानानं जगतां यावं, म्हणूनच. ( आंतून बिनाजी ओरडत येतो. )

**बिना**:—इटुजी ! अरं येऽ इटुजी ! अरं, अरं, ऽ अरंऽ हा मानूस हाय कीं मानसाचं स्वाँग हाय ?

**विठू**--ज्यानं स्वतःच्या बायकापोरांची कदर केली नाहीं, सारे मोहपाश दूर सारून, केवळ देशसेवेला वाहून घेतलं त्या मर्द मराठ्यावर, सेनासागर संताजीराव घोरपड्यावर जर फितुरीसारखे आरोप लादले जातात, तर आम्हासारख्या इतर शिपायांची काय कथा ? नाहीं ! नाहीं ! खरोखरच थोरल्या महाराजांचं तें तेज आज महाराष्ट्रांत नाहीं ! त्यांच्या मागं संभाजीमहाराज कर्तृत्ववान् निधड्या छातीचे पुरुष निघाले, पण त्या कपटी कलुषा खाटकाच्या सुऱ्याला बळी पडले आणि आतां हा त्यांचा भाऊ, प्रत्यक्ष भरत, राजाराम महाराज मोंगली गिधाडांच्या भुलथापांना फसून, संताजीरावांसारख्या नेकजात मराठ्याला, आज रानोमाळ फिरवीत आहेत !

**बिना०**—इटुजी, अरं असं काय करतुयास येड्यावानी ?

**विठू**—( भावनावश ) अरे, गोब्राह्मण प्रतिपालन आणि राष्ट्रोद्धारासाठीं, ज्यानं आपल्या हाडांचीं काडं केलीं, त्या रणगाजी वीरावर, फितुरीच्या चिखलाचे शिंतोडे उडून, त्याच्या थोर कीर्तिला कलंक लागावा, यापरतं दुर्दैव तें कोणतं ! बिनाजी, तूंच सांग ! अरेरे ! दादा ! संताजीदादा ! दादा, तुम्हींच स्वराज्याबाहेर गेल्यावर मी तरी इथं कुणासाठी राहूं ?

**संता०**—( थकला भागलेला वनवासी प्राणी प्र. क. ) तुझ्या महाराष्ट्रासाठीं ! विठूजी, तूं तुझ्या मायभूमीसाठीं इथं रहा.—[ कपारीवरून उडी टाकून खालीं येतो, बिनाजी जातो. ]

**विठू०**--दादा ! संताजीदादा ! ( कडकडून भेटतात. )

**संता०** —शांत हो विठूजी, तुमचं दोघांचं भाषण मी ऐकलं. मला फार आनंद झाला. विठूजी !......नव्हे,...दोस्त !...विठूजी, मित्र असावा, तर तो तुझ्यासारखाच ! आजपर्यंत, माझी सारी उमर शिपायापासून तर प्रत्यक्ष महाराजांपर्यंत, लहानथोर मला ओळखतात, आणि मराठ्यांचा सेनासागर म्हणून मला मान देतात, पण या स्वार्थी जगांत जर कुणी मला ओळखलं असेल, तर पुण्यश्लोक आबासाहेब श्रीछत्रपति शिवाजी महाराजांनीं आणि तूं या विठूजी चव्हाणानंच ! मघां तूं म्हणालास तेंच मी सांगतों कीं, आजवर आयुष्याशीं लढाई खेळत आलों, तें केवळ राष्ट्रोद्धारासाठींच !

**विठू०**—अगोदर घरीं चला. मग ......

**संता०**—नाहीं, आतां थांबता येत नाहीं. धनाजी जाधवाचे लोक माझ्यापाठीवर आहेत, म्हणून असा रानोमाळ हिंडत आहें मी विठूजी !

**विठू०**--आपल्या शेजारीं मी असतांना, धनाजीराव जाधवच काय, पण प्रत्यक्ष काळ जरी खालीं उतरला, तरी त्याची प्राज्ञा नाहीं तुम्हांला स्पर्श करण्याची !

**संता०**—मग वेड्या मी काय नामर्द आहे वाटतं ? पण ज्या दिवशीं महाराजांच्या हुकूमावरून पंतांनीं सेनापतीपदाचीं वस्त्रं काढून घेतलीं, त्याच दिवशीं मी प्रतिज्ञा केली आहे कीं, ज्या हिंदू बांधवांच्या रक्षणासाठीं मी तलवार

हातीं धरली, ती पुन्हां प्राण गेले तरी मराठ बांधवांविरुद्ध उचलणार नाहीं! धनाजी जाधवांसारखे पन्नास जाधव समोर आले असते, अथवा मराठ्यांची सारी सेना जरी माझ्यासमोर उभी राहिली असती, तरी या मर्दानं दोन हात करायला कमी केलं नसतं. पण मी पडलों जातिवंत मराठा! आणि कुणीही अस्सल मराठा, आपल्या बांधवांविरुद्ध लढणार नाहीं, असं मला वाटतं!

**विठू॰**—दादा! दादा! आतां यापुढं हीं अमृततुल्य वचनं, कोण ऐकवणार हो आम्हांला?

**संता॰**—माझी जाण्याची वेळ होत आली, पण जाण्यापूर्वी तुला भेटावं म्हणून मुद्दाम इथं आलों. मरणापूर्वी सेनापती पानसंबळांनीं, तुला माझ्या स्वाधीन केलं, आणि मी सुद्धां आजवर तुझ्या कल्याणासाठींच झटत आलों, पण आज माझ्या हातची गोष्ट संपली.

**विठू॰**—असं कां म्हणतां दादा?

**संता॰**—तुला पुष्कळ सांगायचं शिकवायचं होतं, पण माझं दुर्दैव माझ्या आड आलं. प्रामाणिकपणा, निर्हेतुक प्रेम, आणि निस्वार्थ सेवा हीं खऱ्या दिला-शिवाय तुला कुठंच आढळणार नाहींत, पण माझ्यासभोंवार पसरलेल्या जाळ्यांत माझी मान दिवसेंदिवस अडकत जाऊन, त्या फासाची गांठ माझ्या नरडीला केव्हां विळखा घालील त्याचा नेम नाहीं, म्हणून म्हणतों, माझ्यामागं सावध-गिरीनं राहून राष्ट्रसेवा कर.

**विठू॰**—दादा, आपल्या स्नेहाचा आणि प्रेमाचा मला बाळपणापासूनचा आधार. आपण मला प्रत्यक्ष बंधूचा मान देऊन, शिपायाचा शिलेदार केलांत!

**संता॰**—आणि शिलेदारापुढं तूं मनसबदारहि होशील, आणि अखिल महाराष्ट्र **मराठ्यांचा-मनसबदार** म्हणून तुझ्यापुढं मान झुकवील!

**विठू॰**—पण दादा आपल्या सहवासरूपी यक्षिणीचा आधार नाहींसा झाला ह्या पोरक्या विठूजीचा! आजवर आपल्याबरोबर मराठगादीची बरीवाईट कामगिरी केली, ती दादा, या माझ्या सेनासागराच्या आशिर्वादाचंच फळ नव्हतं

का ? दादा काय वाटेल तें होवो, पण आंगचोरपणा करून, तुम्हांला मी काळाच्या दाढेंत लोटून कधींच स्वस्थ बसणार नाहीं. जिथं आपण तिथं मी! प्रसंग आला तर प्रथम माझा बळी दिला जाईल नंतर सेनासागर संताजीराव!

**संता०**—धन्य झालों मी आज! विठूजी, तूं आपलाच हेका घेऊन बसूं नकोस, तुझ्यासारख्या तडफेच्या योद्धयाची आज महाराष्ट्राला गरज आहे, आणि तुम्हीच जर असे राष्ट्रघातक बनलांत, तर आमच्या आयाबहिणींना मोंगलांचे जनानखाने पहावे लागतील. विठूजी, माझी शपथ आहे तुला, नाहीं आज्ञा आहे कीं, जगलास तरी राष्ट्रासाठींच जग, आणि मेलास तरी राष्ट्रोन्नतीसाठींच धारातीर्थी प्राण सोड. पुण्याई सबळ असली, तर स्वराज्यसेवेसाठीं हजर होईन, नाहींतर हीच अखेरची भेट! पांडवांच्या नशिबीं फांसे उलटे पडले, आणि त्यांना अज्ञातवास पत्करावा लागला! संताजींच्या नशिबीं तेंच ताट वाढून आलं आहे. दैवी घटना कुणाला कळल्या आहेत? विठूजी, येतों मी आतां! (संताजी जातो.!

**विठू०**—
**बिना०**— } (एकदम दोघेहि) दादा! दादा!

**विठू०**—बिनाजी! मराठ्यांचा सेनासागर, पहाडांचा मेरूमणी, एकलेपणाचं आयुष्यं कंठण्यास नजरचुकीच्या बाणानं घायाळ होऊन! जखमी! पेटल्या दिलानं गेला! त्याच्या वियोगानं हृदयाचा बांध फुटणार तर नाहींना? दादा! दादा! तुमच्या शपथेनं हा चव्हाणाचा बच्चा बांधला गेला हो!

**बिना०**—इटूजी त्यांचा सबूत ह्योच महामंतूर! ह्यं पग, खंडूजी–बाबा चिटणीसाचं आन् तुजं लय जमतं खरी ग्वोष्ट कानावर घालूनशान कर फिरतं माघार! अन् कष्टी कशापाय व्हतूसरं!

**विठू०**—तें कसं जमणार बिनाजी? खंडूजीचं महाराज ऐकतील कशावरून?

**बिना०**—म्यां म्हंगतों, तुला डवॉस्कं न्हाई, त्यें उगाच न्हाई! अरं, खंडुजीबाबा म्हंजी हिकमत्यांतला हिकमती! अन् मुत्सद्यांच्या एक्का! साता समिंद्रांतनं हुडकून काढील, किटाळ आल्यालं सेनापतीवरलं! अर जाधवानीं ह्यं, मॉंगलाकडून आणल्यालं वर्मी लावालावीचं दुखणं, वर्मी वखात मिळाल्यावर आपोआप बरं व्हईल. काम करन्याची इशिम आसल्याबिगार कुठं कामं व्हत्यात

न्हयरं ? म्हराठ्यांच्या देवाला, खंडूजीबाबा गुरवाकडनं लाव कौल ! हटकून डाव्या उजव्यानं कळा पडला म्हनून समज. चल पट्ट्या, घे शंभू देवाचं नांव आन् कर मल्हार !

**विठू॰**--बिनाजी, अरे ! महाराजांचा हुकूम चिटणीसांनींच ना कळविला पंतांना कीं, घोरपड्यांचीं सेनापतीचीं वस्त्रं काढून घ्या म्हणून शिवाय आपापसांत उगाच मारामारी नको म्हणून तर संताजी दादानं हा अज्ञातवास पत्करला.

**बिना॰**—अरच्या ! मंग रं कसं ?

**विठू**—त्या दयाघनाची मर्जी ! त्याच्याविरुद्ध कुणाचं काय चालणार ? माय भवानी जें सुचवील तें खरं !

**प्रवेश ४ था**
**समाप्त**

# अंक २ रा



## प्रवेश ५ वा



**स्थळ**:--मान्यांची गढी.
**पात्रें**:—चंद्रा, सूर्याजी, शिपाई. गिरजा,

[ कैदखान्यांत चंद्रा उदास अशी फिरत आहे. नंतर गाणें गाते. ]
( राग-असावरी मिश्र. एकताल. )

**देवा तव आधार । जीवन मम निराधार ॥ धृ॰ ॥**
**स्वातंत्र्याचा सूर्य उगवला । गगनीं नाहीं पुरता चढला ॥**
**तोंच राहुनें त्याला गिळला । हाय ! पसरला अंधकार ! ॥**
**मानव आम्ही हतबल झालो । परिस्थितीनें ग्रासुन गेलो ॥**
**तुझ्या पाऊली लीन जहालों । तूंच आम्हांला सावरणार ! ॥**

**शिपाई**०—( गाणें संपल्यावर ) अंबराईतल्या आंब्याच्या म्हवरागत जवानी तर फुललिया हिची ! नांव इचारलं तर वस्कन अंगावर यितीय ! अवा पगातल्या बराबर म्हातारपनातसुद्धां घाम दरदरून येतुय अंगाला ! गुलाबाचं फूल समूर दिसल्यावर हुंगावसं वाटायचंच मानसाला ! पर मी म्हातारा म्हंगून त्या सुऱ्याजीनं माझीच नेमनुक केली हत ! पर प्वॉटात सारखं गरदाळतंय या बिजलीला पगून ! चिभन क्वॉन येतंय ? त्योच वाटतं ?

**सूर्या**०—( प्र. क. ) ( खोंकतो ) चंद्रा, कां आज अशी उदास कां ? तुझ्यासारख्या स्वैर भराऱ्या मारणाऱ्या मैनेला हा पिंजरा सुखकर वाटतो ना ?

**चंद्रा**०—माझ्या सुखदुःखाची काळजी वहायला तुझ्यासारख्या निमकहरामाला तसदी घ्यायची गरज ?

**सूर्या**०—माझ्यासारख्या मर्द गड्याला तुझ्यासारख्या नाजूक पोरीच्या प्रकृतिकडे दुर्लक्ष करून कसं चालेल ! त्यांतून तूं सेनापती पानसंबळांची मुलगी· मग माझ्याशिवाय कोण वहाणार तुझी काळजी ?

**चंद्रा**०—जन्मभर मराठ्यांच्या अन्नावर वाढलास; रंकाचा राव झालास; रायगडचा किल्लेदार म्हणून मिरवलास; आणि कुत्र्याप्रमाणं मोंगलांच्या उष्ट्या तुकड्याच्या लालसेनं, घात करणारा तूं कसाई, माझी काळजी काय वहाणार ?

**सूर्या**०—चंद्रा बडबड बंद कर ! कुणासमोर जिभली हलवते आहेस, याची शुद्ध आहे ना ?

**चंद्रा**०—तुझ्यासारख्या निमकहरामाला, मांगा कसायाला न ओळखणारं एखादं तरी माणूस आज महाराष्ट्रांत सांपडेल, असं वाटतं कां तुला ? सूर्याजी, जा काळं कर इथून !

**सूर्या**०—पण......

**चंद्रा**०—हजार वेळ सांगितलं कीं, तुझा हा काळा मोहरा, मला दाखवूं नकोस म्हणून. तरी पुन्हां कुत्र्याप्रमाणं लोचटपणा करायला शरम नाहीं वाटत तुला ?

**सूर्या०**—पोरी, शरम बाळगून कसा निभाव लागेल या पिसाळाचा? चंद्रा, हा पहा, मी आल्या पावलीं जातों. पण खानसाहेबांना काय सांगूं? त्यांच्या गोटांत जायची तुझी तयारी आहे. असंच ना?

**चंद्रा०**—मेल्या! मर्दाच्या जन्माला तरी कशाला आलास? स्वार्थासाठीं लालचावून, सारा जन्म मोंगलांच्या तुकड्याची आशा करून, या दशेला आलास तरी तुझे डोळे उघडूं नयेत? थूः तुझ्या जिण्यावर!

**सूर्या०**—पोरी, कशाला उगाच संताप करून घेतेस? जन्मभर तडफडतो आहे, तरों माझा मी स्वतंत्र नाहीं. तर तूं या पिंजऱ्यांतली नाजूक मैना?

**चंद्रा०**—जन्मभर तडफड करून मेलास! दुनियेची उलथापालथ करूनहि कुत्र्याच्या जिण्यानं जगण्याची पाळी आली! तरी तुझे डोळे न उघडतां, आपल्याच आई-भगिनींना खानाकडे पाठवून, मराठ्यांच्या कुळाला कलंकीत करतोस? मेल्या कशाला जीव बाळगतो आहेस? जीव दे!

**सूर्या०**—तुझ्या उत्तरावरच तें अवलंबून आहे. मग बोल आहे ना तुला कबूल?

**चंद्रा०**—(त्वेषानें) पिसाळ! जा-जा इथून. आणि तुला जें कांहीं करायचं असेल तें कर. एकदां सोक्षमोक्ष तरी होऊंदे!

**सूर्या०**—होईल, आतां लवकरच त्याचा सोक्षमोक्ष होईल. सध्यां त्याच कामांत गुंतलों आहें मी.

**चंद्रा०**—मेल्या सत्यानाश होईल तुझा!

**सूर्या०**—तुझा सत्यानाश केल्याशिवाय या सूर्याजीला शांत झोंप येणं शक्य नाहीं. चंद्रा तुझ्या प्राप्तीसाठीं किती कष्ट, किती अपमान सहन करावा लागला, याची कल्पना आहे का तुला? तुझी आणि खानाची एकदां गांठ घालून दिली आणि मला पांच हजार मोहरा मिळाल्या, कीं तुझी तूं आणि माझा मी!

**चंद्रा०**—तुझ्या खानाच्या हातीं मिळायला मी मेलेल्या आईचं दूध प्यालें आहे असं का तुला वाटतं?

**सूर्या०**—उनाड मैना कितीही स्वैर भराऱ्या मारणारी असली, तरी पारध्याच्या जाळ्यांत सांपडून तिचे पंख छाटले गेल्यावर फुकट फडफडाट काय कामाची? चंद्रा, ही सरदार मान्यांची गढी आहे, आणि तूं आमची कैदी आहेस, कशी निसटतेस तें मी पाहीन. चंद्रा, ही मराठ्यांची रायगड राजधानी नसून, वाघाची गुहा आहे, हें विसरूं नकोस.

**चंद्रा०**—अहाऽ रे वाघ! दिवे ओवाळा दिवे! वाघ नाहींस, पण वाघाच्या कुळांत तूं बोकड जन्माला आला आहेस! शत्रूशीं सामना खेळून, आई-भगिनींचं रक्षण करण्यासाठीं धारातीर्थी देह अर्पण करणाऱ्या पिसाळांच्या घराण्यांत तूं गरीब गाईचे गळे चिरणारा कसाई निपजलास!

**सूर्या०**—पोरी, कसाई नाहीं मी, पण खानसाहेबांसाठी साऱ्या गोष्टी मला कराव्या लागत आहेत.

**चंद्रा०**—दगेखोरांना तुमच्यासारखे निमकहराम भेटल्यावर, तुम्ही थोडेच माघार घेणार आहांत? पण तुमच्या या नीच मनोवृत्तींना आळा घालणार परमेश्वर कांहीं झोंपला नाहीं! वेळ आली तर, तुझा आणि तुझ्या त्या साथीदाराचा, मोंगलांची थुंकी झेलणाऱ्या नागोजी मान्याचा त्याच्या गढीसुद्धां निकाल लावायला मराठवीर कमी करणार नाहींत, हें नीट लक्षांत ठेव!

**सूर्या०**—पंख छाटलेले उनाड मैने! पिंजऱ्यांत कोंडून टाकली तरी फडफडाट करतेस? दाणापाणी बंद करतांच आपोआप येशील वठणीवर!

**चंद्रा०**—देशद्रोह्या! शत्रूचे पायपोस चाटणाऱ्या कुत्र्या! मर्कटा, ही पानसंबळाची चंद्रा, उनाड मैना नसून, तुझ्या नरडीचा घोट घेणारी वाघीण आहे! छेडलेली नागीण आहे! किंचित फुत्कार करतांच जळून खाक होशील तूं!

**सूर्या०**—अवसान तर वाघिणीचं, जातिवंत नागिणीचं आणलं आहेस, पण हा सूर्याजी वाघिणीच्या डुरकावणीला भीक न घालतां,

विषारी नागिणींना फुलांचे हार समजून, गळ्यांत अडकवून घेत असतो !

**चंद्रा०**—शोभेसाठीं गळ्यांत अडकवून घेतलेलाच हा हार, तुझा गळफांस ठरेल !

**सूर्या०**—कुणाच्या बळावर गोष्टी करते आहेस ह्या ? त्या पोट्ट्याच्या, विठूजीच्याच ना ? त्या दिवशीं माझी फसगत झाली, म्हणूनच तूं माझ्या हातून निसटलीस, नाहींतर जीव घेतला असता त्याचा !

**चंद्रा०**—अस्सं ! मग त्यावेळीं जीव घेऊन भेकडासारखा दऱ्याखोऱ्यांतून कां पळालास ?

**सूर्या०**—बस्स ! बडबड बंद कर !

**चंद्रा०**—पिसाटा ! तूं कितीही धडपड केलीस, तरी अनाथांचं रक्षण करणाऱ्या थोरल्या महाराजांच्या स्वराज्यांत स्वबांधवांचे गळे चिरणाऱ्या तुझ्यासारख्या गळेकापूला यावज्जन्म सुख कुठलं मिळायला ?

**सूर्या०**—आतां त्या स्वातंत्र्याच्या आणि स्वराज्याच्या गप्पा पुरे झाल्या, चंद्रा, मी काय म्हणतों तें निमूट ऐक. आतां तूं कितीही फुत्कारलीस, नागिणी वाघिणी-सिंहीणीचा आव आणलास तरी तुला सुतासारखीं नरम करण्याची शक्ति या सूर्याजीच्या अंगीं आहे, हें विसरूं नकोस. अजून विचार कर आणि उद्यां मला काय तें उत्तर दे, म्हणजे मी खानाची गांठ घेऊन सौदा एकदां पटवून टाकीन हॅं: हॅं: हॅं: हॅं: ( जातो ).

**चंद्रा०**—हॅं: हॅं: हॅं: हॅं: ! बायल्या मेला ! ( बसते. )

**शिपाई**—दुस्मानाच्या पाठीमागं सारं रान तुडवाया पतकारलं पर आसलं भुयारातल्या क्वॉठडींत आवावर पहारा करायचं काम लय वंगाळ ! नीजतर काय म्हंगती, घडीपळास डोळ झाकत्यात अन यखादी डुलकी आली,

अन् अवा सटाकली का मग कायमचंच झाकायचं, तरी पर आपलं खाकरून खुक-रून झोपल्यालं बरं हॅअ हॅअ ! [ बाजूला झोंपतो ] [ गिरजा प्र. क.]

**गिरजा**—चंद्रका, चंद्रक्का, ग चंद्रक्का !

**चंद्रा०**—कोण गिरजा तूं ? आणि इथं कशी ?

**गिरजा**—चिप मोठ्यानं बोलूं नगस ! पाऱ्यावरला बैल आयकल इकूत

**चंद्रा०**—पण इथं कशी आलीस तूं ?

**गिरजा**—कशी अन् काय, आलें खरी ! अग आपल्या तापसी माताजी हैती ना ? त्यानी आणलं नव्ह का इथवर !

**चंद्रा०**—अस्सं ! पण माझा विठूजी काय करतोय ग् ?

**गिरजा**—कैदखान्यांत डांबून ठिवलीया त्या सूऱ्याजीनं ! त्याचं काय हाय का तुला ? अगुदर हितून भाईर नींघ, आन् मग इटुजीच्या गॉष्टी कर, मोठ्ठी इटुजीच्या पिरिमाची !

**चंद्रा०**—मग सांगना या काळाच्या जबड्यांतून कसं निसटायचं तें ? पहारा तर कसा कडक ठेवलाय मेल्यानं !

**गिरजा**—त्याची नग तुला काळजी ! इटुजी दादा आला हाय बिनाजीला घिऊन; अन् त्यानंच तुजी भ्याट घिऊन सांगाया सांगितलंया कीं, म्यां एक दोन दिसांत करतो तुझी सुटका ! आनी म्हंगाला तिच्या संरक्शीनासाठीं ही कट्यार दे तिला ! ( कट्यार देते. )

**चंद्रा०**—पाह्यलंस ! माझा विठूजी कसा गुणाचा आहे तो ! एकदोन दिवसांत येतो म्हणाला नाहीं ग ? बरं आतां जा तूं. जेवण यायची वेळ झाली इतक्यांत शिपाई इथं हजर होतील. ( शिपाई खोंकतो ) अग जा जा लवकर बोकड जागा झालासं वाटतं.

**गिरजा**—बरं जाते. पर तूं काळजी करूं नगस हां, जातें मी ( जाते ).

**चंद्रा०**—माझा विठूजी ! माझ्या राया ! एक दोन दिवसांत येऊन मला सोडवणार ! अहाहा ! सजणा, हृदयेश्वरा ! तुला कुठं ठेवूं असं झालंय मला !

( राग देशकार–त्रिताक )

**तूं शोभतोस मम वीर खरा ॥ ध्रु० ॥**
**मम हृदयाचा फुल फुलोरा ।**
**वाहीन तुजला वीर वरा**
**पूजिन भावे तुला नरवरा ॥ १ ॥**

**प्रवेश ५ वा**

**समाप्त**

## अंक २ रा

## प्रवेश ६ वा

**स्थळ :**—रस्ता

**पात्रें** :—बिनाजी. सूर्याजी, दाऊदखान,

**बिना०**—ग ऽ ग ऽ ग ! बस्स ! ही यवढी कामगिरी झाली कीं, ह्यो बिनाजी चालला गिरजकडं ! मग ती कुठं का असना ! ( पाहून ) इचिभन ! ह्यो क्वॉन बरं हीकडं येतुय ? अर वा ! ह्यो तर सूर्याजी पिसाट ! लेका ! तुझ्याच न्हवं कां पाठीस हाय ह्यो बिनाजीराव ! आन् ह्यो दुसरा ! चिभन् ? काय लचांड हाय रांडलेकाच्यांच ? ह्यो तर बाटगा दौलती ! बेट्यानों, ह्यो तुमचा बा बिनाजीराव हितं हाय बरं कां ! आतां असं गप दडी मारून लेकाच काय करतात तें बघूं. ( बाजूला बसतो. )

( सूर्याजी एका बाजूनं व दाऊदखान दुसऱ्या बाजूनं प्र. क. )

**सूर्या०**—रामराम ! दौलतराव ! मी...

**दा० खान**—राम राम मत कहो ! सलाम आलेकम् कहो ! मी आतां दौलतराव नसून दाऊदखान आहे दाऊदखान समजलांत ? लेकिन तुम कौन हो ? क्यौं पेश आये हो ?

**सूर्या०**—काय दौलत–नव्हे खान साहेब, या सूर्याजी पिसाळाला आपण अगदींच विसरलेले दिसतां, आपण दोघे रायगडच्या वेळीं...

**दा. खान**—अरे वा ! खरंच सूर्याजीराव, त्यावेळीं मी मुसलमान झालों म्हणून जीवें वांचलों. नाहींतर......बाकी सध्यां माझी चैनच आहे ! पण तुमची प्रकृति इतकी खालावली आहे, कीं प्रथम तुम्हांला मी ओळखलंच नाहीं, शिवाय अचानक गांठ पडली. बरं आहे ना आतां ?

**सूर्या०**—मला वाटलं तुम्हीं मला ओळखतां कीं नाहीं कुणास ठाऊक ! कारण......आतां तुम्हीं मोठे खान, तेव्हां म्हटलं... ..आणि झालंही तसंच !

**दा० खान**—पण ते राहूं द्या. आपण चालला होतां कुठं ? आणि या बाजूला कसे ? मी तर ऐकलं होतं, आपण त्या मराठ्यांच्या राणीच्या तैनातींत–राहिलांत, पण पहातों तर तुम्हीं इकडं !

**सूर्या०**—तें मोठं गौडबंगाल आहे, त्याचं असं झालं, माझ्यासारख्या माणसाला तसलं तैनातीचं तट्टू हांकण्याची नाहीं संवय ! ह्या करामती डोक्यांतून काढली अजब युक्ति ! अन् चाललों राणीचा निरोप घेऊन जिंजिला राजारामाकडं.

**दा० खान**—पण तिनं भरंवसा कसा ठेवला तुमच्यावर ?

**सूर्या०**—खानसाहेब, तुम्हीं एवढें या धक्काधक्कींत मुरलेले, पण आपल्याला नाहीं समजलं तें ! अहो, कैदखान्यांत कित्तीही ऐषआरामांत रहायला मिळालं, अगदी शेंकड्यानं माणसं दिमतींत असलीं, पक्वानांचीं ताटं जरी वाढून आलीं तरी कैदखाना तो कैदखानाच ! अहो पक्षाला पिंजऱ्यांत डांबून ठेवून त्याच्या पुढ्यांत

सोन्याचं ताट ठेवलं तरी, त्याला सुख कुठून मिळायला ? त्याला रानांतच स्वैर भराऱ्या मारणं आवडतं ! तसंच झालंय राणीचं ! बुडत्याला काडीचा आधार, राणी सद्यां कैदेंत आहे पेंचांत ! इकडची तिकडे अन् तिकडची इकडे बात समजायला आहे का कसला आधार ? शिवाय असली बात समजायला विश्वासाचं माणूस जवळ हवं जोत्याजी आहे, पण तो डोळयांत तेल घालून जपतोय त्या पोराला ! मराठ्यांच्या भावी, राजाला ! आणि सद्यां मी केल्या-कृत्याचा पश्चात्ताप हरघडीला राणीच्या निदर्शनास आणून दिल्यामुळें झालं माझं काम !

**दा० खान०**—वा ! फारच कमाल केलीत बुवा ! तिथून निसटण्याची.

**सूर्या०—**बरं, तें जाऊं द्या ! मी आलों आहें आपल्याकडेच, जरा नाजूक काम आहे.

**दा० खान**—सूर्याजीराव, तुम्हीं तरी आजीब आहांत ! कसलं नाजूक काम आणलं अहांत बुवा माझ्याकडं ? कां पहिल्यासारखंच डोकं उडवायची आहे करामत ? त्यावेळीं नशिबानं खैर केली, पण आतां तसं समजणं मूर्खपणाचं ठरेल !

**सूर्या०**—छे, छे ! तसं म्हटलं तर मी आहे सध्यां फार अडचणींत, ही कामगिरी झाली, तर थोडे दिवस कसेही मजेंत जातील, आणि तें तुमच्याकडून होण्यासारखं आहे, म्हणून मी घाईघाईनं जात होतों तुमच्या छावणीकडं, पण तुम्हींच भेटलांत वाटेंत ?

**दा० खान**—तर मग बोलाना, काय कामगिरी आहे माझ्याकडे ? मी अवश्य करीन.

**सूर्या०**—सरदार मान्याना भेटून जात असतां, वाटेंत संताजीच्या सेवका संगती पडली गांठ, तो जात होता पानसंबळाच्या पोरीला आणण्यासाठीं, तिच्या मावशीकडं ! तिला पोंहचती करायची होती चंद्रगडावर ! तो तिला कोणत्या वाटेनं घेऊन जाणार आहे, हें घेतलं त्याच्या पासून काढून, आणि

त्याला केला लंबा ! आणि मी माझा माणूस पाठवून जवळचा रस्ता सांगून आणली माझ्या ठिकाणाकडे, पण ! आचानक तो विठूजी आला आणि त्या कार्टीनं दिला दगा !

**दा० खान**—अस्सं ! मग काय झालं तिचं ?

**सूर्या०**—अहो होतंय काय ! तुमच्या करीमखानानं चढाई केली चंद्रगडावर—

**दा० खान**—पण चंद्रगड त्या विठूजी चव्हाणानं घेतला ना खाना-पासून परत ?

**सूर्या०**—चंद्रगड घेतला ! पण पोरगी पटकावली ना मी अचानक ! सध्या मान्यांच्या गढींत ठेवली आहे तिला !

**दा० खान**—तुमचं काय म्हणणं आहे तें आलं माझ्या ध्यानांत ! तुमचा आशय समजला मला, हँ हँ हँ !

**सूर्या०**—तेव्हां म्हटलं आपली छावणी आहे नजीक, आणि आपण आहांत त्यांतले दर्दी, हो ! सौदा पटला तर करतों, तुमच्या स्वाधीन !

**दा० खान**—पोरगी कशी आहे तें प्रत्यक्ष पाहिल्या शिवाय सौदा कसा पटवायचा !

**सूर्या०**—अहो ! असली बिजली साऱ्या आयुष्यांत पाहिली नसेल तुम्हीं नुसती परी आहे, परी !

**दा० खान**—अच्छा, तुम्हीं तिची तारीफच करतां तर माझं कांहींच म्हणणं नाहीं, पण सौदा केवढ्यावर पटवतां ?

**सूर्या०**—नगद पांच हजार मोहरा ! अहो आपल्याला त्या नगाचें, सहज दहा हजार मिळतील !

**दा० खान**—छे, छे, छे ! इतका भारी सौदा पटणं कठीण !

**सूर्या०**—खानसाहेब प्रत्यक्ष पहाल तेव्हां आपल्याला समजेल, त्याची किंमत !

**दा० खान**—हें पहा सूर्याजीराव, ओढून घेण्यांत अर्थ नाहीं चार हजारांत पटवून टाका, पाहिजे असल्यास या घडीला देतों, चला !

**सूर्या०**—खानसाहेब ! छे, छे ! तसं नका क......

**दा० खान**—बोलूं नका, चला ! अगदीं योग्य सौदा पटवला आहे, पण सूर्याजीराव, तुम्ही सांगतां तशी खरोखरच का ती परी इतकी खुबसूरत आहे ?

**सूर्या०**—खानसाहेब आपण तिला प्रत्यक्ष पाहिल्यावर तिच्या स्वरूपतेची ! तारीफच करावी लागेल आपल्याला ! अहो साऱ्या महाराष्ट्रांत इतकं सुंदर गुलाबाचं फूल नाहींच नाहीं. पण तिकडे दिल्लीच्या बाजूला असली चमकदार कळी आपणांस पहावयाससुद्धां मिळणार नाहीं. उगाच नाहीं एवढी मी तिची तारीफ करीत !

**दा० खान**—तुम्हीं सांगतां तशी जर ती इंद्राची परी असेल, तर तिला अवश्य पांहिली पाहिजे सध्यां तर तिला मान्यांच्या गढींत अडकवून ठेविली आहे, मग तिला इथवर कशी आणतां येईल ?

**सूर्या०**--तेंच तर फार कठीण आहे ! आजवर त्या हडळीसाठीं मी अनेक संकटं, मनस्वी हाल सोसले आणि मोठ्या शिकस्तीनं मान्यांच्या गढींत आणली ! जर कां मान्यांचं साह्य मला नसतं, तर तिला हस्तगत करणं फार कठीण काम होतं ! शिवाय मान्यानासुद्धां तिच्याबद्दल थोडीशी आशा लागली आहे. तेव्हां म्हणतों तिला तिथून झटकन काढलेली बरी नाहींतर सारंच काम फिस्कटायचं. माने इथं नाहींत तोंच कामगिरी आटपली पाहिजे !

**दा० खान**—मग तुम्हींच कां नाहीं तिला इकडे घेऊन येत ? वाटल्यास मी माझ्या हाताखालचे स्वार तुमच्या मदतीस देतों;

**सूर्या०**—खानसाहेब ! आपण सांगतां तितकं सोपं नाहीं तें ! अहो, तें गुलाबाचं फूल असलं, तरी कांटे आहेत त्याला तुम्ही मदत दिल्यावर कांटे मोडायला अवकाश काय ? पण तसं न करतां तुम्हीं स्वतःच जर याल, तर फारच मजा होईल ! तें फुलपांखरू तुमच्या स्वाधीन करीन अन् मी होईन त्या

जंजाळांतून मोकळा ! बरोबर स्वार घेऊन या नाहींतर मान्यांची नजर फिरली ! तर व्हायचा येळकोट मल्हार ! म्हणून म्हणतों सावध असलेलं बरं !

**दा० खान**—त्याची नका करूं फिकर ! अच्छा मग मी कधीं येऊं !

**सूर्या०**—परवां या मग देतों तुमच्या स्वाधीन करून !

**दा० खान**—पण सूर्याजीराव, आमच्या छावणीचा तळ जवळच आहे, शिवाय आपण इथवर आलाच आहांत, तेव्हां आजची रात्र काढा आमच्या छावणींत, अन् सकाळीं धरा मान्यांच्या गाढीची वाट ! मी आलोंच तुमच्या पाठोपाठ !

**सूर्या०**—खानसाहेब ! तिकडं लवकर गेलेलं बरं ! नाहींतर काय नेम ? आयती पकडलेली शिकार व्हायची पोबारा !

**दा० खान**—तिचा पक्का बंदोबस्त केला आहे ना तुम्हीं ? मग निसटून कशी जाईल ?

**सूर्या०**—त्याचा काय नेम ? आजकाल भरंवसा कुणावर ठेवायचा ! हटकून गुण देणारच औषध कातील विष ठरायचं ! तरीपण आपण इतका आग्रहच करतां तर आजची रात्र काढूं आपल्या सहवासांत मजेंत !

**दा० खान**—अहो ! म्हणून तर मी तुम्हांला आग्रह करतों ! इंषाल्ला ! आजच्या खुशालीच्या बातमींत देऊं लहज्जत उडवून ! कांहीं कांहीं गोष्टींत जरी बादशहाचीं ताबेदारी करणाऱ्या आम्हां बाटलेल्या सरदारांनां अपमान सोसावा लागत असला तरी ! ख्याली-खुशालीच्या रंगेल ऐषआरामांत तें सारं विसरायला होतं ! माझ्या हाताखालचा तो, कासमखान, त्यानं विजापूरहून एक दख्खनी छोकरी आणली आहे. नाचण्यांत मोठी वाकबगार आहे अशी तिची ख्याती आहे, तेव्हां......

**सूर्या०**—अस्सं ! मग तर काय मजाच आहे !

**दा० खान**—चला ! तर मग !

**सूर्या०**--चला ! अहो ! असली पर्वणी कोण दवडील हातची. ( दोघेही जातात. )

( इतका वेळ दडून बसलेला बिनाजी प्र. करून. )

**बिना०**—बेट्यानों, तुमची प्वॉरी इकण्याची खलबतं चालल्यात व्हय रं ? पर ह्यो ! बिनाजीराव तुमचं दांत पगा कस घालतो तुमच्या घशांत ! तरी म्हंगालों मायंदाळ ह्य दोघ चवार कसलीं खलबतं करत्यात ! बस्स !असंच, करायचं ! इट्टूजीला सांगून, देतो भडका उडवून ! ह्यो बिनाजीराव असा तसा हाय व्हय !

## प्रवेश ६ वा

## समाप्त

# अंक २ रा



## प्रवेश ७ वा



[ **स्थळ:**—मोंगलांची छावणी, दाऊदखानाचा शामियाना ]

[ **पात्रें:**--दौलती उर्फ दाऊदखान, सूर्याजी पिसाळ, महमद, नर्तकी ]

**दा० खान**--सूर्याजीराव, नाच, गाणीं आपण पुष्कळ पाहिली ऐकलीं असाल पण मी जिची तारीफ करतों, ती विजापूरी छोकरी, कांहीं और आहे. (टाळी वाजवून नोकराला बोलवतो. ) महमद ! जरा लहज्जत के लिये, पहेले शराब लाव, और छोकरी ·!......काय सूर्याजीराव इकडील मराठ्यांची हालहवाल आपल्या कानीं असेलच ?

**सूर्या०**---खानसाहेब ! कसली हालहवाल घेऊन बसलेत ! अहो मराठ्यांचा राजा, सध्यां बसला आहे जिंजित अडकून ! आणि इकडे संताजी, धनाजींचं घोडं. पाणी पीत नाहीं एक ठिकाणीं ! कधीं भडका उडतोय तेंच बघायचं आहे ! नागोजीराव माने सध्यां त्याच खटपटींत आहेत.

**दा० खान**—अहो ! तें सारं खरं, पण झुल्पकिारखान बसले आहेत ना आज कैक दिवस जिंजीच्या किल्ल्याला टक्करा देत ! पण किल्ला पडण्याचं चिन्ह

कांहीं दिसत नाहीं अजून ! संताजी मात्र सारखा हैदोस घालतोय महाराष्ट्रापासून कर्नाटकापर्यंत ! इकडील रसद झुल्पीकारखानाना बिलकूल मिळत नाहीं. माणसं, जनावरं उपास अन् रोगराईमुळं पटापट मरताहेत ! पुढं कसं होणार ?

**सूर्या०**—अहो तें ! सारं होईल, मराठेमराठ्यांची एकदां झुंज जुंपली कीं मग काय अवकाश ! बरं तें जाऊं द्या ! ह्या राजकारणानं एकदां मी पुरता होरपळलोंय ! त्यांतच पडून, राख करून घ्यायची नाहीं माझी इच्छा ! तेव्हां त्या गोष्टी न केलेल्याच बऱ्या !

**दा० खान**—अस्सं ! अस्सं ! तुम्हीं फारच विटलेले दिसतां त्या बाबतींत ! अच्छा तुम्हांला आवडत नाहींत त्या गोष्टी उगाच करा कशाला ? त्यांत आज आपण आमचे पाहुणे ! महंमद बुलाव उस लडकीको !

**महंमद०**--जी, हुजूर बुलाता हूं !

( अगोदर त्यांना दारु प्यायला देतो, नंतर जातो. )

**सूर्या०**--खान साहेब, आपल्या शराबाची लहजत कांहीं और आहे. रायगड सोडल्यापासून आज प्रथमच......नाहीं, नागोजीरावांनीं आग्रह केला होता एकदां......

**दा० खान**--खूब ! खूब ! स्तुति केलीत आमची बुवा तुम्ही ! पण या स्तुतीला पात्र आमचा महम......

**सूर्या०**—खानसाहेब ! अहो स्तुति कसली त्यांत--

( नर्तकी येते )

**दा० खान**--वा ! आलीच की ! होने दो ! होने दो !

( नर्तकी नाचते )

**सूर्या०**--(नशेंत वाहवा) वाहा...वा...वा...खूब...खु...खु...खान सा ...साहेब...मे...मेनका...उ, उ. वंशी झक् मारतात हिच्या पुढं ! नाच... नाच...सुंदर...नाच !

**प्रवेश ७ वा**

**समाप्त**

# अंक ३ रा

## प्रवेश १ ला

[ स्थळः—मान्यांची गढी, तिच्या शेवटच्या टोंकातील तळघर, तुरुंग.]

[ पात्रें:—चंद्रा, दाऊदखान, विठूजी चव्हण, सूर्याजी, माने, महंमद, बिनाजी ]

( तुरुंगांत चंद्रा विचारांत बसली आहे. इतक्यांत दाऊदखान प्रवेश करतो. )

**दा० खान**—( स्वागत ) इंषाल्ला, क्या माशूक है ! ( उघड ) क्यों ! नाझनन कसल्या विचारांत बसली आहेस ! आतां यापुढें तुला कसलाच विचार करण्याची गरज पडणार नाहीं, वाटेल तो इंतजाम, चाहेलती वस्तु,तुझ्या पायाजवळ लोटांगण घालीत येईल, मग असल्या फिकरमनसुब्यांत बसण्याचं काय कारण ? एकदां कां खानसाहेबाशीं निका लागला, कीं मग तुमचा तो स्वर्ग दोनच बोटं उरला, असं तुला वाटेल !

**चंद्रा**०—मेल्या मांगा, असा पुढं ये, म्हणजे तुलाच दाखवतें स्वर्ग कीं, यमपुरी किती लांब आहे ती ! [ कटयार काढून उभी रहाते ].

**दा० खान**—ओहो ! लाहोलवलाकुवत ! मला त्या टिचभर पात्याची डर दाखवतेस ! माझ्या कमरेस लटकत असलेली ही तेज समशेर हिच्यापुढं तुझ्या त्या टिचभर पात्याची काय करामत ? दाऊदखान इतका कच्च्या दिलाचा भेकड नाहीं. कीं तुझ्या सारख्या कोवळ्या पोरीच्या लुसलुशीत ओठांतून निघालेले बोल अन् टिचभर पोलादी पात्याची हुलकावणी डर पाहून, इथून आपला पाय काढील, मुकाट्यानं खंजीर खालीं टाक, आणि मी सांगतों तें निमुटपणं, ऐकून घे !

**चंद्रा**०—बंद कर ! मस्तवाल बोकडा ! तुझी वटवट बंद कर ! आणि निमूट इथून चालता हो, मला तुझं, कांहींच ऐकून घ्यायची इच्छा नाहीं !

**दा० खान**—ए ! मस्तवाल पोरी, कुणाची बेअदब करतेस ! हा दाऊदखान म्हणजे तूं कोण समजलीस ? करीमखानाचा दुय्यम म्हणून मी या स्वारीवर आहे, शिवाय या मान्यांचा गढीच्या आसपास माझे शेंकड्यांनीं शिपाई दबा धरून बसलेले आहेत, खालीं इषारत मिळतांच सर्व गढीला, क्षणाचा विलंब न लागतां वेढा पडेल ! माने सद्यां दुसऱ्याच कामांत मशगुल आहेत आणि ते जरी इथं असले तरी, आमचेच साथीदार आहेत, कारण तुझा सौदा ज्यानं पटवला, तो सूयाजी पिसाळ मान्यांचा दोस्त असून आतां या घडीला तो इथंच-आहे ! तेव्हां तुझी घमेंडखोर वटवट अन् बडबड त्या टिचभर पात्याच्या करामतीवर करूं पाहशील, तर फुकट-फुकट जिवाचे हाल करून घेशील.

**चंद्रा०**—बेमूर्वत कावा ! मराठ्यांच्या मुलीला जिवाच्या हालाची डर नाहीं, उलट त्यांच्या पावित्र्याचा प्रश्न उपस्थित झाला, तर त्या वाघिणीप्रमाणं चवताळून, पावित्र्य विडंबन करणाऱ्याच्या नरडीचा घोट घेतील, म्हणून म्हणतें, बेलगाम सोडलेल्या बाष्फळ बडबडीला, वेळींच आळा घालून चालता हो !

**दा० खान०**—अस्सं ! तेढी बात चालवलीस, निमूट ऐकून घ्यायची तुझी इच्छा दिसत नाहीं ! तुझ्यासारख्या छप्पन पोरी, या खानानं काखोटीला मारून दिल्लीला पोंहचत्या केल्या आहेत ! ( तो चाल करून पुढं तिला धरायला जातो. )

**चंद्रा०**—बेमुर्वत बाटग्या बोकडा ! एक पाऊल पुढं टाक, हा जंबिया तुझ्या छाताडांत खुपसलाच म्हणून समज !

**दा० खान**—( टाळी वाजवतो, एक शिपाई पुढं येतो. ) महंमद, लगाव समशिरका फटका और निकाल दो खंजीर उसीके हातसे ! बहोत बकवा लगाया है !

**महंमद०**—हुजूर, फटका तो लगावूगा. मगर कट गयी तो ?

**चंद्रा०**—ये असा पुढं ये ! ( ती शिपायावर चाल करून जाते. खान तिच्या पाठीमागून तिच्या हातांतील कट्यार काढून घेतो. )

**दा० खान**—क्यों ! छबिले पोरी ! आतां माझ्या कचाट्यांतून कोण सोडविल तुला आँ ! टिचभर पोलादी पात्याच्या जिवावर दिमाख दाखवीत होतीस नाहीं, या खानाला ?

**चंद्रा०**—मेल्या मांगा ! आम्हां हिंदुचा परमेश्वर अनाथ-अबलांची हांक ऐकतांच, क्षणांत तुझं नरडं फोडायला इथं येईल. जो प्रल्हादासाठीं स्तंभातून प्रगट झाला, तो ! माझी-पवित्र दीन अबलेची हांक त्याच्या कानीं गेली नसेल, असं कां वाटतं तुला ?

**दा० खान**—मग मार हांक, तुझ्या त्या परमेश्वराला ! या मान्यांच्या गढींत त्याचा मी काळ उभा असतां-[ विठूजी प्र. क. ]

**विठू०**—हा पहा तुझा काळ समीप आला ! एक पाऊल पुढं टाकशील तर, एका झटक्यासरसं तुझं शीर धडा वेगळं करीन !

**दा० खान**—एहे रे ऽ मर्द ! तुझं मुंडकं शाबूत राहील कीं काय, याचा विचार केला आहेस कां अगोदर ?

**सूर्या०**—[ सूर्याजी झोंकाड्या देत प्र. क. ] ख...खानसा...हेब ती बेफाम...घोडी खोगीर ना...नाहीं टाकून देत ! चाबकाचे फटकारे ओढा !

**विठू०**—चूप ! पिसाट कुत्र्या, बेफाम बरळलास तर जीभ मुळासकट उखडून काढीन.

**सूर्या०**—एँ ! कोण ? विठूजी ! हा हा...हा...नादा...न पोरटा इकडं कसा आला ? खानसाहेब ?

**दा० खान**—मूर्खा ! तुझ्या करामतीनं !

**सूर्या०**—का...य खानसाहेब, तुम्हींसुद्धां फिरलांत म...माझ्या-वरती अँ ?

**दा० खान**—[ टाळी वाजवतो ] कौन है !

**विठू०**—त्याचा मी बंदोबस्त करून आलों आहें, मुकाट मरणाला तयार हो !

**दा० खान**—पोरा ! तूं मला कोण समजतोस !

**विठू०**—तुला मी, खूप समजतों, यवनांचीं उष्टीं हाडं चघळून माजलेला पोळ तूं, बाटगा दौलती ! आतां दाऊदखान झाला आहेस नाहीं ?

**सूर्या०**—का...य ! एकटा...दोघांना भारी ? अरे...प...पण माझी त...तलवार !...तलवार !

**दा०खान**—बे मुर्वत ! फुकट मरायला आलास इथं !

**विठू०**—अस्सल, मराठ्याला वायफळ बडबड नको ! पोलादी पात्याची चमक ! चल ! [दोघे लढतात. खानाच्या हातांतील तलवार पडते. दोघे खंजीरानं लढतात. खान मरतो.] [खानाची पडलेली तलवार घेऊन, सूर्याजी विठूजीला मारण्यास जातो; चंद्रा तिथेंच खानाचा पडलेला खंजीर फेकून मारते; सूर्याजी जखमी होऊन जातो.]

**सूर्या०**—आँ चांडाळणी—

**चंद्रा०**—मर ! निमकहराम ! कुत्र्याच्या मोतीनं मर, मराठ औलादीला कलंक लावणाऱ्या मांगा ! मर ! [नागोजी माने प्र. करतो.]

**ना० माने**—हा कोण ? आणि इथं कसा ?

**विठू०**—ज्याच्या मर्दुमकीनं चंद्रगड करीमखानापासून मराठ्यानीं परत घेतला, तोच हा ! हिंमत बहाद्दर विठूजी चव्हाण !

**ना० माने**—अस्स ! विठूजी चव्हाण ! पोरा, पिढीजात माने सरदारांच्या या सिंहाच्या गुहेंत त्याच्या परवानगी शिवाय तूं पाऊल टाकलं आहेस, याची दख्खलगिरी आहे ना तुला ?

**विठू०**—माने ! बापजाद्यांनीं कमावलेल्या निढळाच्या घामाच्या श्रीमंतीवर, ऐतखाऊपणानं ताव मारणाऱ्या माणसाची कींव येते मला !

**ना० माने**—वादळी वाऱ्याच्या तुफानी झंझावातानं आकाशाला भिडणारे वृक्ष जिथं लोळण घेतात, तिथं तुझ्यासारख्या ओठावरला जार अजून सुकला

नाहीं, त्याची काय बिशाद ? मान्यांच्या समोर बेताल जिभलीची फिरत वाटेल तशी फिरवूं पाहशील, तर तिला मुळासकट उखडायला वेळ लागणार नाहीं ! तिला वेळींच आळा घाल, नाहींतर मान्याची नजर फिरतांच तिचा बंदोबस्त होईल !

**विठू०**—जातिवंत मराठ्याची–जिभली नागीण, पोलादी पात्याची फेंक, तुझ्यासारख्या मोंगलीं हाजीं हाजींची बटीक नव्हे ! स्वराज्यासाठीं रंगणांत उतरणारे मराठे तुफान दर्याच्या लाटेवर बेगुमान खेळतील; स्वराज्य दिलदौलतीची सलामती राखण्यासाठीं, सिंहाच्या जबड्यांत हात घालून, त्याची जीभ बेधडक छाटतील, मान्याचा पुरता बंदोबस्त करूनच, विठूजीचं पाऊल मान्याच्या गढींत पडलं आहे !

**ना० माने**—असली बेडरवृत्ती दाखवून, नागोजीला दिपवूं पहातोस काय ? आणि तें कशाच्या जिवावर ? कसल्या हिंमतीवर, कुण्या जोरावर ?

**विठू०**—निधड्या छातीच्या मराठ गड्याला, दुसऱ्याच्या जिवावर उड्या मारण्याची संवय नसते. त्याची मदार स्वतःच्या मनगटावर अन् पोलादी खांड्यावर—त्याच्या हिंमतीवर असते, समजलांस ?

**ना० माने**--जखमी चित्त्याची छलांग सुटलेल्या बाणाच्या नेमानं, नेमका नरडीचा घोट घेईल, बेदरकार सवाल छेडून माथ्याचा अंगार कां करतोस ? तुझ्यासारख्या तरण्या बांडाची रग जिरवायला, कसलेल्या मान्यांच्या मनगटाचा कस उतरला, असं का वाटतं तुला ?

**विठू०**--कसलेल्या मनगटाचा दिमाख दाखवणाऱ्या मान्या, दग्यानं संताजीचा घात करणाऱ्या दगलबाजा ! सिंहाच्या पोटीं जन्माला येऊन कोल्ह्याची आवलाद ठरलास !

**चंद्रा०**—एवढा दिमाख तुमच्या कसलेल्या तलवारीचा होता, मग, त्या नरशार्दूलाजवळ, मराठ्यांच्या सेनापति, संताजी घोरपड्याजवळ दोन हात करण्याची संधी कां गमावलीत ?

**विठू०**—कपटानं, पाठीमागून वार करून, संताजी दादांचा खून केलास आणि स्वतःच्या तोंडाला काळी राखुंडी फासून, मान्यांच्या कुळाला कलंकीत केलंस !

**ना० माने**--विस्तवाच्या ठिणगीवर फुंकर घालून, वणवा लावण्याची करामत कां करतोस ! त्यांत तूंच जळून जाशील याचा विचार केला आहेस का !

[ बिनाजी प्रवेश करतो. ]

**बिना०**--अवो ऽऽ सवताच्या घराला आग लागली त्यचा इषारा अगुदर करायचा टाकूनश्येनं दुसऱ्याला जाळतायसा व्हय ? साऱ्या गडीला आग लावून शान, ह्यो पळ्या आलाय, जरा कान देऊन ऐका, [ आंत हरहर महादेव अशी गर्जना होते. ] इटूजी पगतोस काय ? उडाव मुंडकी ह्या बेरडाची ?

**ना० माने**--खूब गाजरं खाऊन ढेकरं देण्याचा आव आणला आहेस पण मान्याची तलवार तितकी फुरसत देणार नाहीं हें लक्षांत असूं द्या, विठूजी चल मरणाला तयार हो !

**बिना०**—जिबली लय रं वळवळती, म्यां म्हंगतो उतार मुंडकी या कोल्ह्याची.

**ना० माने**—तुझी मुंडकी धडा वेगळी करण्याची करामत, मान्यांच्या तलवारींत आहे समजलास ? बेताल बकबा बंद कर.

**बिना०**—रग आलेल्या बैलागत, डुरकावण्या तर लई मोठ्यानं फोडतुयास औरंग्याच्या साठमारींतला नंदीबैल !

**चंद्रा**—बिनाजी ! माने किती झाले तरी पिढीजात सरदार आहेत, त्यांचा असा अपमान करणं योग्य नाहीं, जरी त्यांनीं वाटेल तें निंद्य कर्म केलं असलं तरी त्यांच्या घराण्याकडं पाहिलं पाहिजे ! माने मराठ दौलतीसाठीं शर्तीची तलवार मारली असतीत, तर तुम्हांला मानानं राहतां आलं नसतं कां ?

**ना० माने**—पूर्वापार चालत आलेल्या सरदारीनं मोगली अन्नाचे मिंधे घांस आमच्या गळीं उतरले, त्या अन्नाला जागण्यासाठीं...

**विठू०**—पण त्या मिंध्या अन्नाच्या जागरुकतेसाठीं ! आपल्याच जात भाईचे गळे कापण्यास तयार झालांत असंच ना ?

**ना० माने**—[ स्वगत ] तळ्यांत राहून माशानं माशाशीं वैर करण्या-सारखं झालं खरं ! [ उघड ] खाल्लेल्या अन्नाला जागणं हा गुन्हा नव्हे !

**विठू०**—माणूस जातीला कलंक लावणारं मेलेलं अन्न खाऊन कुतर ओढीचं जिणं काय कामाचं ! निढळाच्या घामाचं स्वतंत्र बाण्याचं जगणं पृथ्वी मोलाचं आहे ! माने, बकरी होऊन शेंकड्यानं पावसाळे-काढण्यापेक्षा वाघ होऊन एक क्षणभर जगलेलं अधिक मोलाचं नाहीं वाटत आपल्याला ?

**ना० माने**—अलबत ! कां नाहीं वाटणार ?...

**चंद्रा०**—मग अजूनही स्वराज्यांत सामील होऊन केल्या अपकीर्तीचा डाग, स्वराज्य हितासाठीं, शिकस्तीची तलवार गाजवून धुवून टाकतां येईल !

**ना० माने**—मुली ! हरदासी तट्टाप्रमाणं धनी नेईल तिकडे जाण्यांत आम्ही आमचं कर्तव्य समजतों ! धन्याच्या मर्जीविरुद्ध दिशेला गेलों तर चाबकाचे फटकारे खावे लागतील ?

**विठू०**—माने ! धनी, आणि चाकर हें, नातं स्वराज्य सेवकाच्या गांवींहि नाहीं. त्यानं एकच ध्येय ठरवलेलं असतं ! आई भगिनींच्या अब्रूचं रक्षण आणि माय देशाचं बंधविमोचन ! धरित्री आईनं दिलेली कांदाभाकर सुखानं खातां, यावी, गुलामगिरींत राहून मेलेल्या पक्वान्नांची भरलेलीं ताटं नकोत त्याला !

**ना० माने**—[ स्वगत ] सरदारी बाण्याच्या ऐषआराम रंगेल वृत्तींत आम्हीं, निद्रावश झालों खरें ! [ उघड ] विठूजी, चंद्रा, तुमच्यासारखीं रत्नं ज्या देशांत निर्माण होतात त्या देशांत देशद्रोही पाप्यांचीं पापं तुमच्या सारख्यांच्या लोकोत्तर गुणांनीं, आपोआप धुवून निघतात. आज माझे डोळे उघडले ! बस्स ! आजपासून ही माझी तलवार स्वबांधवासाठीं स्वराज्यासाठीं अर्पण केली ! हीच माझी प्रतिज्ञा !

**चंद्रा०**—अहा ऽऽऽ! काय ऐकतें मीं हें ! माने तुमच्यासारखे सरदार स्वराज्याला मिळाले तर स्वराज्याचा, स्वतंत्र महाराष्ट्राचा भगवा झेंडा त्रिखंडी फडकेल !

**विठू०**—एकाएकीं तुमचं मन वळलेलं पाहून, आमच्या मनाला आनंद झाला! मायभवानी तुम्हाला उदंड आयुष्य देवो!

**ना० माने**—पश्चात्तापाच्या दग्धतेनं माझं हृदय होरपळून निघत असतां त्याच भडक्यांत प्रतिज्ञेचे बोल उच्चारले पण, हें काळं तोंड राजाराम महाराजांना त्या महाराष्ट्राच्या राजाला कसं दाखवूं! ते मला जवळ तरी करतील का?

**चंद्रा**—त्याची नका करूं काळजी. महराज थोर अंतःकरणानं आपल्याला आश्रय देतीलच देतील?

**ना० माने**—तर मग त्या पुण्यवंताच्या पायाचं दर्शन घेऊन मान्यांच्या कुळाला लागलेला हा कलंक साफ धुवून टाकूं!

**प्रवेश १ ला**

**समाप्त**

# अंक ३ रा

## प्रवेश २ रा

[**स्थळ**:—जंगल, ओढा, रस्ता.]

[**पात्रें**:—सूर्याजी, तापसी मीरा, गिरजा, बिनाजी.]

[सूर्याजी ओढ्याच्या काठीं जखमी होऊन पडला आहे. पाणी मागतो.]

(राग सारंग–त्रिताल)

**प्रभूराया घेई अवतारा**
**यवनें छळली माय भू धरा ॥ ध्रु० ॥**
**करुणा भाकिती साधूजन हे**
**कांच न करिशी दया सागरा ॥ १ ॥**

**सूर्या०**—[ तापसी मीरा गाणं गात प्र. क. ] कुणाचा स्वर ? कोण गात आहे ? देवते ! पाणी ! पाणी ! कोण तूं ! थोडं पाणी पाज ! जीव व्याकूळ होत आहे ! पाणी ! अं ऽ हा–हाँ ! ती ऽ ऽ माझ्या, बुद्धीला भ्रम झाला नसल्यास, ती तूंच असावीस ! होय ! तूंच ती ! तो, तो, तुझ्या कपाळावर तो वण, माझ्या तलवारीचा लागलेला वार ! हो तूंच ती, मी रायगड खानाच्या स्वाधीन करींत असतांना, होय तूंच ती, माझी मीरा ! मीराच तूं !

**ता० मीरा**— [ स्वगत ] अगबाई ! मला तर यानीं ओळखलंच, आतां शेवटच्या घडीला, कशाला उगाच कष्ट द्या त्यांच्या आत्म्याला ! [ उघड ] होय मीच ती, तुमची मीरा !

**सूर्या०**—परमेश्वरा आँ ! काय मी हें ऐकतों ! नेक इमानासाठीं जिनं आपलं सौभाग्य कुंकू पुसलं, नेकीची कास धरून जिनं प्रत्यक्ष आपल्या नवऱ्याबरोबर दोन हात केले, तीच मीरा ! निमकहरामी केलेल्या खाल्ल्याघरचे वासे मोजणाऱ्या, कर्म चांडाळाला, तुमचीच मीरा म्हणते ! दैव अघटीत आहे मीरा ! मीरा ! मी कर्म चांडाळानं त्यावेळीं तुझं ऐकलं असतं तर, आज हें कुत्र्याच्या मोतीनं लाजीरवाणं मरण कां आलं असतं !

**ता० मीरा**—झाल्या गेल्या गोष्टी बद्दल उगाच मनाला कां खेद मानून घेतां ? मरण हें कुणालाच चुकलं नाहीं, पण असलं मरण वैऱ्यालासुद्धां येऊं नये !

**सूर्या०**—पण मीरा ! मीं तर मराठ्यांचा आणि तसाच मोंगलांचाही दुष्मन म्हणून माझ्या वांट्याला आलेलं हें योग्य मरण आहे. आजवर माझ्या हातून किती घोर कृत्यें घडली, छे ! छे ! छे ! पशुपक्षांनों, वृक्ष वल्लरींनों! आप ! तेज ! वायु आदि पंचमहाभूतानों साऱ्या मानव सृष्टींत महाराष्ट्रांतल्या मनुष्य जातीसं झंझावाताच्या वेगानं त्यांच्या कर्ण ऱ्हद्रांत जावून सांगा कीं, स्वजातीवर उलटणाऱ्या देशद्रोह्यांना जनावरांच्या मोतीनं मरण येतं, केल्या कृत्याचं फळ त्याच जन्मी भोगावं लागतं !

**ता० मीरा**—अरेरे! कलंकीत सौभाग्या अंतरीच्या कळकळीनं नाना-प्रकारच्या हिताच्या गोष्टी समजाऊन सांगीतल्या पण आपलं परधार्जिणं मन वळलं नाहीं तें नाहींच, तर उलट असलं मरण आपल्या नशिबीं लिहीलं होतं, नाहींतर अशी दुर्बुद्धी आपल्याला कां आठवली असती!

**सूर्या०**—मीरा, विधात्यानं माझ्या नशिबीं जें लिहिलं होतं, तें पश्चात्तापाच्या दग्ध अंतःकरणानं मी ह्या यमयातना शेवटच्या घडीला मोठ्या कष्टानं भोगीत आहे! झाली गुजरी विसरून जा आणि तुझ्या या पापी पतीला पाणी पाज! कितीही पापी असलों, तरी तुझ्या हातच्या पवित्र जलानं माझ्या पापाचं थोडं तरी क्षालन होईल! मी अशा स्थितींत असतां तूं, मला लाथाडून जाशील? कां नाहीं जाणार? माझीं असंख्य पापं...

**ता० मीरा**—नका गडे उगाच जिवाला कष्ट देऊं! अशा प्रसंगीं कुणाही प्राण्याला तडफडत ठेऊन मी गेलें नसतें, मग तुम्हीं तर माझे सौभाग्य देव!

**सूर्या०**—काय! काय ऐकतों मी हें! खरंच मीरा तूं या पाप्याला क्षमा केलीस?

**गिरजा**—[ बिनाजी, गिरजा प्रवेश करतात ] त्या पग माताजी, अन् ह्यो कोन?

**बिना०**—ह्यो तर पिसाळ, आरारारा! काय दशा लेकाच्याची! अगदीं कुत्र्याच्या मोतीनं मरतोय गुलाम! माताजी, मरू द्या त्यास्नी असाच, लई वंगाळ कारवाई केलीय लेकाच्यानं!

**ता० मीरा**—बिनाजीं, कशाला बोलतोस त्यानां, हे माझे सौभाग्य देव आहेत!

**बिना०**—कसलं घेऊन बसलायसा सोभाग देव! आवो ह्य रायगडचं गडकरी सुऱ्याजी पिसाळ नव्ह कां?...

**ता० मीरा**—आणि मी त्यांची गडकरीन! रायगडच्या भुयारांतून गड खानाच्या स्वाधीन करण्यासाठीं हे जात असतां यांना मी आडवी आलें, त्यावेळीं,

तलवारीच्या झटापटींत यांच्या तलवारीच्या वारानं मी जखमी होऊन खालीं पडलें, यांना वाटलें, मी मेलें, त्यावेळीं झालेल्या जखमेचा वण हा पहा माझ्या कपाळावर तसाच आहे ! जा त्यांचा जीव पाण्याविना तडफडत आहे, थोडं पाणी आण !

**सूर्या०**—[ बिनाजी पाणी आणण्यास जातो. ] हाँ ! होय मला आठवतं ! मी परत आलों त्यावेळीं तूं तिथं नव्हतीस ! हाँ...

**ता० मीरा**—तुम्हीं खानाला फितूर झाल्याचं निळोजी आटपाटीकराला माहीत होतं, तो तुमचा पाठलाग करीत भुयारांत आला, पण मला तिथं विव्हळतानां पाहून त्यानं तुमचा पाठलाग सोडून मला घेऊन बाहेर आला !—

**सूर्या०**—काय हाँ आँ—निळोजी ! अरेरे ! मीरा तुला जीवदान देणाऱ्या निळोजीला मी कर्म चांडाळानं दग्यानं मारविला, ओय ! पाणी ! पाणी ! बिनाजी, गिरजा, पानसंबळाच्या चंद्राला सांगा, मरतां मरतां सूर्याजीनं तुझ्या-जवळ क्षमा मागितली. क्षमा करा मला ! अँ हाँ ! पा—णी ऽ ऽ [ मरतो ]

**ता० मीरा**—झालं खेळ संपला ! त्यांच्या पूर्व पुण्याईमुळं त्याना सौभाग्य मरण आलं, आणि मी पत्नीधर्म विसरलें म्हणून मला वैधव्याच्या खोल गर्तेत पडावं लागलं ! हे कमनशीब नशीबा, विधात्याचे खेळ अतर्क्य आहेत ! बिनाजी यांच्या देहाला शेवटचा भडाग्नी देऊं !

[ राग जोगी–असावरी ]

**अंधकार हा झाला । दैव घाली जणु कठोर घाला ॥ धृ० ॥**
**देश द्रोह हा कशास केला । स्वार्थ काय तुम्ही कसा साधला**
**देई विधाता शासना ॥ १ ॥**

**प्रवेश २ रा**

**समाप्त**

# अंक ३ रा

## प्रवेश ३ रा

[**स्थळ**:—अजिंक्य तारा, बगीचा.]

[**पात्रें**:—चंद्रा, विठूजी, बिनाजी, गिरजा.]

[ चंद्रा एका चौथऱ्यावर विचार करीत बसली आहे. विठूजी पाठीमागून येऊन तिच्या कानाला गवताची काडी लावतो. ती दचकून उठते ]

**विठू०**—दचकलांतशा ? म्हटलं अजिंक्य तारा आहे हा ! एखाद्या पिसाळाची किंवा खानाची धास्ती बाळगण्याचं मुळींच कारण नाहीं, इथं कडेकोट बंदोबस्त न् जागता पहारा, वाऱ्यानं पांचोळा सळसळला नुसता, तर शेंकडों तलवारी म्यानाबाहेर पडतील आपल्या संरक्षणासाठीं मग भिण्याचं कारण ?

**चंद्रा**—अवचित अंगलट केल्यावर, नाहीं वाटतं भिणार कुणी ?

**विठू०**—बरं झालं, मोठ्यानं ओरडलांत नाहीं म्हणून, नाहींतर या गरीब शिलेदाराचा मुडदाच पाडला असता, इथल्या लोकांनीं !

**चंद्रा**—पांच पन्नासांचीं मुंडकीं छाटणारा शिलेदार, आजच भागुबाईची भाषा बोलूं लागला, नवलच वाटतं बाई मला ! पण कायहो शिलेदार, आहो जाहो, बोलायला कधींपासून शिकलांत ?

**विठू०**—हा आतांच धडा घेतला ना आपल्यापासून शिवाय राजधानीचे कबिले आहेत इथं, तेव्हां म्हटलं भाषा जपून वापरलेली बरी, नाहींतर व्हायचा गरीबाचा कडेलोट !

**चंद्रा०**—अस्सं ! एकंदरींत शिलेदारी थाट, न् जिवाला भितां अचाट ! पण आलां कधीं तें नाहीं सांगितलंत मला ? फारच दमलेले दिसतां, चला थोडी विश्रांती घ्या, मग बोलूं गप्पा !—

**विठू०**—अग कसल्या घेऊन बसलीस गप्पा ! आतांच आलों न् परत याच घडीला पंतांचा हुकूम झाला आहे दरबारला जाण्याचा ! पण तुझं, या कांटेरी गुलाबाचं दर्शन घेतल्याशिवाय पुढं पाऊलच टाकवेना !

**चंद्रा०**—अस्सं ! [ रागावते ] मी कांटेरी गुलाब काय ?

**विठू०**—अग अशी रागावतेस काय ? मी काय खोटं सांगितलं होय ! ज्यांनीं, ज्यांनीं या गोड गुलाबाचा आभिलाष केला, त्यानां त्यानां काटयांचा प्रसाद चाखायला मिळाला ! खानाचा जीव गेला, पिसाळ देशोधडीला लागला— म्हणून म्हणतों—

( राग तिलंग-त्रिताल )

**हा गुलाब फुलवाया जो भजला ।**
**खचित् खचित् ठार झाला ॥ धृ० ॥**
**देश प्रेमी तुज वीर लाभला ।**
**देई जिवाचा घास सफलता ॥ १ ॥**

**चंद्रा०**—हृदयाला भिडणारे प्रीतीचे बोल बोलण्यास कधीपासून शिकलास विठूजी ? तुझ्यावरून जिवाचं लिंबलोण . ओवाळून टाकावसं वाटतं ! सख्या, प्रीतीची प्रेमगंगा दुथडी भरली असतां, तिच्यांतील ओंजळभर पाणी प्यावसं नाहीं वाटत तुला ?

**विठू०**—कां नाहीं वाटणार ? ओंजळभरच काय पण पोटभर प्यावसं वाटतं, दोन प्रेमी हृदयांचं मीलन एकठिकाणीं झालं, म्हणजे एकरूपतेचा सागरच होतो, आणि त्या सागराच्या लाटांवर मनसोक्त पोहावसं वाटतं जिवाला !

**चंद्रा०**—जिवाच्या जिवलगा, प्रीतीचा धागा छेडल्यावर माझ्या चंचल मनाची वावडी तुझ्या भोंवती सारखी घिरट्या घालीत असते, पण तुला कुठं आहे त्याची दखल ?

**विठू०**—चंद्रा, माझ्या मनाला तुझ्या मोहाचा पाश अडकवून ठेवीत आहे. स्वराज्याच्या कामगिरीसाठीं पुढें पाऊल टाकावं, तों तुझ्याकडं पाहिलं

म्हणजे तुझ्या नजरेचा भाव, माझ्या हृदयाचा ठाव घेत असतां, मनाला बेदिल करणारी स्वराज्याची कामगिरी समोर उभी राहते ! चंद्रा, स्वराज्याची कामगिरी, माझ्या हातून व्हावी असं नाहीं वाटत तुला ?

**चंद्रा०**--कां नाहीं वाटणार ? आपला प्रियकर साऱ्या दुनयेंत सूर्याप्रमाणं चमकावा असं कोणत्या प्रियतमेला वाटणार नाहीं ! सख्या प्रीतीचं जाळं तुझ्यापुढं टाकलं म्हणून तुला राग का आला ?

**विठू०**--तुझ्या सारखा फांसे पारधी भेटल्यावर कुणा प्राण्याला मोह होणार नाहीं त्यांत अडकवून घेण्याचा ! बाकी कोळ्याच्या जाळ्यांत मासा अडकला, तर तो सुटून जाण्याची पळवाट शोधतो, पण प्रेमाच्या जाळयांत अडकलेला माणूस प्रीतीच्या जाळयाचे धागे, अधिक गुंततात का हेंच पहातो, चंद्रा, मामासाहेबांनीं तुला माझ्या सुपुर्द केल्याला, आज एक वर्ष संपून उद्यांच्या पौर्णिमेला दुसरं सुरू होईल, पण......

**चंद्रा०**--पण काय ? कां ! अशी नजरेला नजर रोखून, निरखून काय पाहतां ?

**विठू**—तुझ्या गोंडस गुलाबी गालावर, तुझ्या--माझ्या निस्वार्थ प्रेमाची साक्ष म्हणून, शिक्का मोर्तब करण्याची संधी कधींच आली नाहीं.

**चंद्रा०**—सेनापति संताजीराव घोरपड्यांच्या तालमींत तयार झालेले मराठे, संधीची मार्गप्रतिक्षा कधींपासून करूं लागले ?

**विठू०**—माझ्या संताजीदादाच्या शिक्षणाचा तुला इतका. अभिमान वाटतो तर ? सेनांपतीचा भाऊ, हा मराठ्यांचा शिलेदार, तुझं पाणीग्रहण करण्यासाठीं, तुझा हात या मावळत्या सूर्यनारायणाला साक्ष ठेवून आपल्या हातांत घेत आहे ! चंद्रा

**चंद्रा**—विठूजी ..मला सावरा हो ! [ त्याच्या छातीवर मान ठेवते ]

**बिना०**—[ प्र. क. ] गा-ग-ग...अररररऽ ! हें काय ?

[ विठूजी चंद्रा बाजूला सरतात ] गिरजा. अग येऽ गिरजा आग चौरी बिवरी असल तर घिऊन ये !

विठू०—कायरे ये बिनाजी ! अगदीं मुहूर्त साधायला नेमका इथं आलास नाहीं ?

बिना०—आरं, पन जरा दम धर, अग ये चौरी आन म्हंगतुया ना ? [ प्र.क.]

गिर०—अवो पर कशा पाई ?

बिना०—आग या, चंद्राक्काला भवळ आलीया जणू ! !

गिरजा—खराच कीं काय ? चंद्राक्का !

चंद्रा—अग काय ऐकतेस त्याचं !

विठू०—त्याला अलीकडं असाच मिरगीचा झटका येत असतो ?

बिना० —आर आतां म्यां मांज्या डोळ्यांनीं पगितलं, चंद्राक्काचं डवॉस्क-

चंद्रा—बिनाजी !

बिना०—अवो म्या कशापाय सांगू त्यं ! अग चंद्राक्काचं डवॉक्स इठुजी दादानं छाताडावर धरलं व्हतं आन्...

विठू०—आता तोंड बंद करतोस कां ?...? ( तरवार काढतो ).

बिना०—आर ! म्या पर त्यंच म्हंगतुया !

चंद्रा—विठूजी ! आतां दरबारची वेळ होत आली, दरबारला नाहीं का जायचं ?

बिना०—आर, र, र, र, म्यापर त्यंच सांगाया आलोया नव्हका !

गिर०—[ वेडावून ] आलोय नव्हका !

बिना०—आगा ग गा ? अग पर तूं मधींच अशी मिरचीवानी काय चुरचुरतीयास !

विठू०—चल ये लेका आतां—

बिना०—आन् म्या पर त्यंच म्हंगतुय नव्हका !

विठू०—चल, चंद्रा ! गिरजा ! चला ! [ जातात ]

## प्रवेश ३ रा

## समाप्त

# अंक ३ रा



## प्रवेश ४ था



[ **स्थळः**— सातारा–अजिंक्य तारा–महाल. ]

[ **पात्रेंः**—२ भालदार राजाराम महाराज, हुकमतपन्हा रामचंद्रपंत, खंडोजी बल्लाळचिटणीस, नागोजी माने, विठूजी, चंद्रा, गिरजा, बिनाजी, भालदार, हुजूऱ्या. ]

[ जाळीदार पडद्याच्या आंतल्या बाजूला मराठ्यांच्या स्त्रिया बसल्या आहेत.] मराठ्यांचा दरबार महाल सरदार मानकरी, उंची पोषाखानें नटून बसले आहेत, इतक्यांत ललकारे ललकाऱ्या पुकारीत प्रवेश करतात. मागून हुकमत-पन्हा रामचंद्रपंतासह श्रीछत्रपती राजाराम महाराजांची स्वारी, धीर गंभीर प्रवेश करतात. सर्व मंडळी उठून मराठ्यांच्या छत्रपतींना मानांचा मुजरा करतात. ]

**१ भालदार**—हुशियार ! श्रीछत्रपती राजाराम महाराज !

**२ भालदार**—गोब्राह्मण प्रतिपालक क्षत्रिय कुलावंतसः श्रीछत्रपती राजाराम महाराज हुशियार !

**राजा॰**—चिटणीस ! पंत ? ! मराठ्यांची राजधानी काबीज केल्यावर औरंगजेबाला वाटलं असेल, मराठी राज्य हां हां म्हणतां धुळीस मिळवूं ? पण त्या त्याच्या साऱ्या वल्गना आम्हीं धुळीस मिळविल्या, जिंजीवरून उड्डाण करून आम्हीं दख्खनात सही सलामत आलों ! गेलेलं वैभव पुन्हां परत मिळवून दंड थोपटून आम्हीं सामने उभे आहोंत...पण ! आमच्या मनाला सदा बेचैन करणारी गोष्ट म्हणजे मराठ राज्याच्या कोंदणांत भर घालणारे संताजी सारखे हिरे अकस्मात निखळून पडले नसते तर, मराठ–दौलत त्या हिऱ्यांच्या तेजानं अधिक चमकली असती, पण आमचं दुर्दैव कीं, महाराष्ट्राचं ?

**खंडू०**—महाराज! निष्ठूर निसर्गाची करणी कुणाला कळली आहे ? मराठ राज्याची मुहूर्तमेढ पुण्यश्लोक आबासाहेबांनीं घातली, त्या घडीपासून, ज्यांचं कुणासही मोल करतां येणं शक्य नाहीं, असे कित्येक हिरे स्वराज्याच्या कामीं आले! आणि या हिरकणी खाणींत एकापेक्षां एक कोहिनूर चमकले व उद्यां चमकणार आहेत! मग उगाच मनाला खंत कां ?

**राजा०**—खंडूजी तुमचं म्हणणं बुद्धिला पटतं, पण संताजीच्या बाबतींत झालेला अन्याय या छत्रपतीच्या नाजूक मनाला नाहीं पटत, आजवर हजारों वीर झाले कित्येक आहेत, किती होतील, पण माझ्या राज्याचा आधारस्तंभ माझा संताजी, मला पुन्हां नाहीं भेटणार! संताजी! हायरे संताजी वीरा! सारी पृथ्वी खोदून काढली तरी तूं आतां मला थोडाच दिसणार आहेस! अरेरे! कसली विपरीत बुद्धी आमच्या मनाला शिवली, आणि महाराष्ट्राचं नर-रत्नं आम्हीं हरवून बसलों. हाय रे दुर्दैवी राजारामा,! तूं कसल्या घोर निद्रेंत मग्न राहून संताजीसारख्या नरशार्दूल वीराला, अकल्पित गमावून बसलास !

**रा० पंत**—महाराज ! महाराज!! शोक आवरा! आणि झाली गुजरीची खंत न बाळगतां छपत्रतींचं कर्तव्य म्हणून महाराष्ट्र राज्याचा हा गाडा सुरळींतपणें चालूं द्या

**राजा०**—पंत आपण या दुर्दैवी राजारामाची कोणत्या प्रकारें समजूत काढतां ? साऱ्या महाराष्ट्राचं केवढं नुकसान आमच्या हातून झालं आहे, याची आपण कल्पना तरी केली आहे काय ?

**खंडू०**—मराठ्यांचा-सेनासागर रणमैदानांत शत्रूशीं सामना देत कामाला आला असता, तर महाराजांच्या मनाला बिलकूल खंत वाटली नसती, पण...

**हुजऱ्या**—[ प्र. करून मुजरा करतो ] महाराज बाहेर नागोजी माने आले असून मुलाखतीची आज्ञा मागताहेत——

**राजा०**—कोण नागोजी ? नागोजी मान्यांचं इथं काय काम ?

**विठू०**—महाराज ! क्षमा, मान्यानां मींच अभयवचन देऊन इथं येण्याबद्दल रुकार दिला होता.

**राजा०**—अस्सं ! जा घेऊन या त्यानां [ नागोजी प्र. क. मुजरा करतो ] या, नागोजी माने ! आपल्याच भाईबंदांचे गळे चिरणारे कसाई, नागोजी माने ते आपणच नां ? किती हजार होनांचा विडा उचलून या राजारामाचं शिरकमल बादशहाच्या पदकमलीं अर्पण करण्याची प्रतिज्ञा करून इथं आलां अहांत बोला ?

**ना० माने०**—महाराज क्षमा ? आपले शब्दबाण मान्यांच्या काळजाला छेदून आरपार जात असले तरी नागोजीचे कृतापराध इतके आहेत कीं, साऱ्या मराठशाहीचं जें काळीज, तेंच त्यानं कापलं आहे ! त्या अपराधाची भरपाई म्हणून आपण नागोजीला जी सजा द्याल, ती थोडीच आहे.

**खंडू०**—कृतापराधानं दग्ध झालेल्या नागोजी मान्याना तीक्ष्ण शब्दांचे फटकारे चढवून त्यांच्या पश्चात्तापानं पोळलेल्या मनाला जास्त होरपळून काढण्यांत काय अर्थ ?

**रा. पंत**—पण मान्याचं इमान ?

**ना० माने**—महाराज हा, नागोजी माने, मराठ दौलतीची चाकरी करण्यास हात बांधून इथं आला आहे. मराठ लक्ष्मीच्या कुबेराचा वरदहस्त पितृवात्सल्यानं मायेची पांखर मिळावी म्हणून, मान्यांची तिरपी मान एक-निष्ठेच्या मुजऱ्यासाठीं, या छत्रपतींच्या चरणापुढं झुकली आहे.

**राजा०**—पण ! मान्यांच्या निष्ठेची शाश्वति ?

**रा० पंत**—बावन कशी सोनं तावून सुलाखूनच शंभर नंबरी ठरत असत; महाराजांनीं क्षमेला विलंब करूं नये असं वाटतं !

**राजा०**—मराठशाहिचे दुष्मन ठरलेले नागोजी माने, मराठशाहीशीं निष्ठेची शपथ घेऊन हात बांधून आमच्या मुजऱ्याला आले. आणि पंत

व चिटणीसांनीं विनंती केली म्हणूनच आम्ही नागोजी मान्यांना क्षमा करीत आहोंत.

**ना० माने**--धन्य झालो मी आज ! पण आजचा हा दिवस या हिंमत बहाद्दर विठूजी चव्हाणामुळेंच दिसला. आणि गुलामगिरी मोंगली अन्नावर मरणाऱ्या मला स्वातंत्र्याचं सुवर्ण ताट जेवायाला लाभलं—

**खंडू०**—महाराज ! विठोजीची कर्तबगारी लक्षांत घेण्यासारखी आहे.

**बिना०**—( स्वागत ) आन् माजी ?

**राजा०**--पंत, या हिम्मतबहाद्दर विठूजीला ठरल्याप्रमाणें मराठ्यांच्या मनसबदारीचीं वस्त्रं द्या. (हुजऱ्या पोषाख आणतो. राजाराम तो विठूजीला देतो. विठूजी मुजरा करतो ) विठूजी, आज पासून आपण **मराठ्यांचे मनसबदार झालांत.**

**खंडू०**—विठूजी, चंद्रा ? बिनाजी, जा चंद्राला घेऊन ये. ( तो चंद्राला व गिरजेला घेऊन येतो. ) महाराज, विठूजीच्या कामगिरीबद्दल त्याला मनसबदार केलंत पण चंद्राचं बक्षीस ?

**राजा०**—चंद्रा, तुझ्या शौर्यामुळं आम्हाला चंद्रगड मिळाला. मराठ-वीरांगना कशा असतात, हें तूं जगाला पटवलंस. त्या तुझ्या कर्तबगारीबद्दल बक्षीस हा आघाडीचा म्होरक्या आम्ही तुला देत आहोंत. ( चंद्राचा हात विठूजीच्या हातांत देतात. ती लाजते )

**बिना०**—आन्, म्या ? ( बिनाजी व गिरजा एकमेकांकडे पाहून खुणा-वतात. खंडोजीचं लक्ष जातं )

**खंडू**—बिनाजी, तुला पण हवी कां मनसबदारी ?

**बिना०**—नन्-नग-नग-अं—ही,

**खंडू०**—बरं, बरं, गिरजा, याचा नीट सांभाळकर. ( खंडूजी गिरजेचा हात बिनाजीच्याहातां त देतो. )

**राजा०**--पंत, चिटणीस आणि बंधूनों, आपल्यासारखे शूर योद्धे, मुत्सद्दि मातबर लाभले,म्हणूनच आजचा हा सुवर्णदीन आम्हाला उगवला. आपण ज्या निष्ठेनं स्वराज्याची आणि मराठ-गादीची सेवा केलीत, तशीच सेवा करून मराठशाहीचा " भगवा झेंडा " हिमचलावर रोवणारी भावी पिढी निर्माण करा. बा परमेश्वरा, आजवर आलेलीं हजारों संकटं निवारून मराठशाहीची इभ्रत राखलीस तशीच सदैव राख, हीच तुझ्या चरणीं आमची प्रार्थना आहेः—

( राग भैरवी-ताल-त्रिताल )

**दीव्य दिव्य गगनीं झळकला ।**
**भगवा झेंडा प्यारा-प्यारा ॥ धृ० ॥**
**फुलें कळया बहरल्या ।**
**तेजें उजळल्या [दाहि] दश दिशा ॥**
**जीव-जीव-आनंदला ।**
**ऐक्य लाभ झाला ॥ १ ॥**

[के. बाळ कृत.]

**समाप्त**

